मराठी ग्रंथालय संघ प्रकाशनः १

# पंचारती

लेखक :

श्री. अ. का. प्रियोळकर, बी. ए.

डॉ. पु. म. जोशी, एम्. ए., पीएच्. डी.

श्री. बा. गं. खेर, बी. ए., एल्एल्. बी.

श्री. र. श. पारखी.

श्री. शं. ग. दाते.

आवृत्ति १ ली

मुंबई, १९४६

किंमत दोन रुपये

# — ओवाळणी

मराठी ग्रंथालय संघाचें **पंचारती** हें पहिलें प्रकाशन वाचकवर्गापुढें ठेवण्यास आम्हांला आनंद होत आहे.

गेल्या ऑक्टोबर १९४५ मध्यें, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाच्या वतीनें मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेचें दुसरें अधिवेशन श्री. **बाळासाहेब खेर** यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें होतें. या अधिवेशनाच्या वेळींच मराठी ग्रंथालयांची संघटना व संवर्धन करून त्यांच्या अभिवृध्यर्थ शक्य त्या मार्गांनी झटण्यासाठी " **मराठी ग्रंथालय संघ** " या स्थायी संघटनेची प्रतिष्ठापना करण्यांत आली.

ग्रंथालयें व वाचनालयें यांच्या अभिवृध्यर्थ संघाने ज्या अनेक साधनांचा अवलंब करण्याचें ठरविलें आहे, त्यापैकीं ग्रंथालयीन चळवळीचें मार्गदर्शन करणाऱ्या वाङ्मयाचें संपादन व प्रकाशन करणें हा उद्देश प्रमुख आहे व त्या उद्देशा-नुरूपच प्रस्तुत पुस्तक आज बाहेर पडत आहे.

' पंचारतीं 'त – वर उल्लेख केलेल्या – वाचनालय परिषदेचे अध्यक्ष श्री. **बाळासाहेब खेर**, स्वागताध्यक्ष डॉ. **पुरुषोत्तम महादेव जोशी**, ( ग्रंथपाल, मुंबई विद्यापीठ ग्रंथालय ) दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटक श्री. **अ. का. प्रियोळकर**, पुण्याहून मुद्दाम परिषदेंत निमंत्रित केलेले पाहुणे श्री. **शंकर गणेश दाते** व श्री. **रघुनाथ शतानंद पारखी** यांच्या परिषदेत झालेल्या भाषणांचा संग्रह करण्यांत आला आहे. शिक्षण व साक्षरता-प्रसार, ग्रंथालयशास्त्र, वाङ्मयसंशोधन, वाङ्मयसूची, वर्गीकरण शास्त्र वगैरे ग्रंथालयीन चळवळींची जीं वैशिष्ट्यें त्यांत वरील विद्वानांचा अधिकार केवढा मोठा आहे हें निराळें सांगण्याची आवश्यकता आहे असं नाहीं. हीं भाषणें म्हणजे ग्रंथालय शास्त्र व ग्रंथालयीन चळवळ यांचा ज्ञानकोशच म्हटलें तरी चालेल. संघाच्या प्रकाशन कार्याचा ' श्रीगणेशा ' अशा वैशिष्ट्यपूर्ण पुस्तकाने घातला जात आहे ही आनंदाची गोष्ट होय.

' पंचारती ' प्रसिद्ध करण्यांत अनेक व्यक्तींचें आम्हांस साहाय्य झालें आहे. त्यापैकीं श्री. म. शं. साठे, व्यवस्थापक प्राज्ञ छापखाना वाई व श्री. र. शं. मुळगांवकर (चित्रकार) यांचा स्वतंत्र उल्लेख केला पाहिजे. या उभयतांच्या सक्रिय साहानुभूतीशिवाय ' पंचारती ' इतक्या लौकर वाचकांपुढें येऊंच शकली नसती. श्री. साठे, श्री. मुळगांवकर प्रभृती सर्व सहाय्यकांचा मराठी ग्रंथालय संघ ऋणी आहे.

**मराठी ग्रंथालय संघ,**
C/o मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय,
ठाकुरद्वार, मुंबई २

मराठी ग्रंथालय संघाच्या विद्यमाने
**वासुदेव विष्णु भट**
कार्यवाह

# अनुक्रमणिका

# मराठी ग्रंथसंग्रहशास्त्राची तोंडओळख*

लेखक—श्री. अ. का. प्रियोळकर

आपल्या अंगांतील किंवा हवेंतील उष्णतामान पाहाण्याकरितां जसें थर्मोमिटर हें उष्णतामापक यंत्र असतें, तसें एकाद्या राष्ट्राचें शहाणपण पाहावयाचें असल्यास त्या राष्ट्रांतील ग्रंथसंग्रह हेंच खरें ज्ञानमापक यंत्र होय. रा. ब. गोपाळराव हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यानीं हीच गोष्ट निराळ्या शब्दांत फारच उत्कृष्ट रीतीनें मांडलेली आहे. ते आपल्या एका निबंधांत म्हणतात, " हरएक राष्ट्राची ज्ञानाची गणती त्या राष्ट्रांतील ग्रंथांचे सामग्रीवरून करतां येते. जसें इंग्रजी भाषेंत अनंत ग्रंथ आहेत त्याप्रमाणें इंग्रजाचें शहाणपणही आहे. संस्कृत भाषेंत ग्रंथ आहेत, त्याप्रमाणें हिंदु लोकांचें शहाणपण आहे. फारसी भाषेंत ग्रंथ आहेत त्याप्रमाणें इराणचे लोक शहाणे आहेत. व त्याचप्रमाणें मराठी भाषेंत जितके ग्रंथ आहेत तितकेच मराठे शहाणे आहेत. तेव्हां ग्रंथसमुदाय वाढविणें हें लोकांचें शहाणपण वाढविणें असें आहे. आणि भाषेंत ज्ञानवृद्धींकर ग्रंथ असावे, हेंच भाषेस व राष्ट्रास भूषण आहे...आपले भाषेंत याहून अधिक चांगले ग्रंथ जों जों होतील तों तों आपणा महाराष्ट्रजनास अधिक श्रेष्ठपणा येईल. "× यावरून राष्ट्राच्या मोठेपणांत ग्रंथांना केवढें मानाचें स्थान आहे व आपण हा जो ग्रंथसंग्रह व ग्रंथसंरक्षण करण्याचा उद्योग चालविला आहे त्याचें महत्त्व केवढें आहे तें स्पष्ट होईल.

---

* ता. १९ आक्टोबर १९४५ रोजीं दुर्मिळ ग्रंथप्रदर्शनाच्या उद्घाटनाच्या प्रसंगीं केलेलें भाषण.

× लोकहितवादी-निबंधसंग्रह. १८६६ पृ.

## मुद्रणकलेचा पहिला प्रवेश

मुद्रणकला अस्तित्वांत आल्यापासून ग्रंथाचे स्वाभाविकच दोन विभाग पडले. हस्तलिखित व मुद्रित. इसवी सनाच्या १८०० पूर्वीचें आपलें सारें ग्रंथ-भांडार हस्तलिखित होतें व त्याच्यानंतरच्या वाङ्मयावर मुद्रणाचा संस्कार होऊन तें लोकांपुढें येत आहे. पंधराव्या शतकाच्या मध्यांत युरोपांत मुद्रण-कलेचा शोध लागला खरा, पण हिंदुस्थानांत तिचा प्रवेश होईपर्यंत आणखी एक शतक लोटलें. मुद्रणकलेचा पहिला प्रवेश हिंदुस्थानांत १५५६ सालीं झाला. कारण याच वर्षी सप्टेंबरच्या ६ तारखेस गोवें येथें **जुवांव द बुस्तामांति** नांवाचा एक मुद्रक पोर्तुगालहून छापखान्यासह येऊन पोंचला. आणि तेथें सेंट पॉलच्या कॉलेजांत त्यानें हा छापखाना थाटला. प्रथम या छापखान्यांत जे ग्रंथ छापले गेले ते सारे लॅटिन किंवा पोर्तुगीज भाषेंत होते. परंतु पुढें दुसरा एक छापखाना दक्षिणेकडील सासष्टींतील रायतूर ( Rachol ) या गांवीं असलेल्या सेंट इग्नेशसच्या कॉलेजमध्यें स्थापन झाला. हिंदुस्थानच्या भूमीवर पाय ठेवणारा जो पहिला इंग्रज **फादर थॉमस स्टिफन्स** त्यानें रचिलेलें सुप्रसिद्ध मराठी खिस्तपुराण या मुद्रणालयामध्यें १६१६ सालीं छापलें गेलें. या ग्रंथाची भाषा मराठी असली तरी लिपि रोमन होती. रोमन लिपीमध्यें आणखी कांहीं मराठी ग्रंथ या छापखान्यांत छापले जाऊं लागले व पुढें कांहीं वर्षांनीं सेंट पॉलच्या मुद्रणालयामध्येंही मुद्रित झालेले कांहीं मराठी ग्रंथ उपलब्ध आहेत. यापैकीं ' वनवाल्याचो मळो ' ( कृषीवलाचा बाग ) नामक गोमंतकी मराठींतील प्रवचनसंग्रहाच्या मुखपृष्ठावर मजकूर आढळतो तो असा:—

याच्यांत

**वनवाळयाचो मळो जो जेजूच्या सांगात्या पाद्री मिंगेल द आल्मैदान बामण भाषेंत घडुनु लिहुनु उदेगिलो ( तो ) पवित्र इंक्विझिसांव आगि ओर्दिनाऱ्याच्या निरोपान गोयां सां पावलाच्या कोलेजींत सोळासीं अठ्ठावन्नाव्या वरुसा लिहितमंडपीं ठांसिला.**

* Printing Press ला ' **लिहितमंडप** ' असें मिळालेलें हें पहिलें **देशी नामधेय होय.**

—अ. का. प्रियोळकर

## शिवाजी व छापखाना? भिमजी पारेख.

१९४२ मध्यें मुंबईमध्यें जी पांचवी All India Library Conference भरली त्यावेळीं आजच्यासारखेंच ग्रंथप्रदर्शन भरविण्यांत आलें होतें. त्या प्रदर्शनाचें उद्घाटन करतांना माजी गृहमंत्री व सुविख्यात गुजराती साहित्यसेवक श्री. कन्हय्यालाल मुनशी यांनीं जें विद्वत्तापूर्ण भाषण केलें, त्यांत शिवाजी महाराजांनीं एक छापखाना घातला होता, परंतु चालवितां न आल्यामुळें १६७४ सालीं भिमजी पारेख याला त्यांनीं तो विकला असें म्हटलें आहे. या ग्रंथालयपरिषदेच्या रिपोर्टांत प्रसिद्ध झालेल्या, मुद्रणशास्त्रावरील एक साक्षेपी लेखक व मुद्रणकलेचे तज्ज्ञ रा. सुंदरराव वैद्य याच्या लेखांतही अशाच प्रकारचें विधान आहे. मी वाचलेल्या पोर्तुगीज, इंग्रजी, फ्रेंच किंवा मराठी ग्रंथांत किंवा शिवकालीन पत्रव्यवहारांत हा शोध मला आढळला नाहीं. या विधानाच्या मुळाशीं कांहींतरी गैरसमजूत असावी अशी माझी कल्पना आहे. सुरतहून कंपनीला पाठविलेल्या ता. ९ जानेवारी १६७० च्या एका वखारीच्या पत्रांत भिमजी पारेख हा प्राचीन ब्राह्मणी ग्रंथ छापूं पाहत आहे, तरी त्याच्याकरितां एक कार्यक्षम मुद्रक पाठवा व त्याला तो दरसाल पन्नास पौंड देण्यास राजी आहे, असा मजकूर सांपडतो. पुढें ता. ३ एप्रिल १६७४ च्या लंडनहून सुरतला पाठविलेल्या पत्रावरून या कामीं मि. हेन्री हिल्स नांवाच्या मुद्रकाची योजना झाल्याचें दिसतें. ता. ८ मार्च १६७५ च्या लंडनहून सुरतला आलेल्या पत्रांत भीमजीचा छापखाना ठीक चालल्याचें ऐकूं इच्छितों व तेणेंकरून आमच्या धर्माचा प्रसार होऊन मुलुखाप्रमाणें आत्मेही आपणाला मिळतील अशी आशा व्यक्त केली आहे. या पत्राला उत्तर ता. २२ जानेवारी १६७६ रोजीं सुरतेहून पाठविलेल्या पत्रांत मिळतें. त्याचा सारांश असा:—भिमजीच्या अपेक्षेप्रमाणें त्याला अद्याप यश मिळालेलें नाहीं. परंतु इंग्रजी पद्धतीप्रमाणें बनिया अक्षरें तयार करण्याची त्याची अविश्रांत खटपट चालूं आहे. आमच्या मुद्रकाला तर छापण्याशिवाय इतर धंदा माहीत नाहीं. भिमजीच्या माणसांनीं बनिया अक्षरांनीं (Banian characters) छापलेले कांही कागद आम्हीं पाहिले आहेत. ते सुवाच्य आहेत, परंतु याला जास्त अनुभवाची गरज आहे. तरी खिळे तयार करणार फौंडर पाठवा. ता. १५ मार्च १६७७ च्या ईस्ट इंडिया कंपनीच्या पत्रांत

छापखाना यशस्वी व्हावा, अशी आपली इच्छा आहे आणि मिळाला तर फौंडर पाठवूं असाही मजकूर आढळतो. परंतु शिवाजीचा छापखाना होता, याला मात्र कोठेंच आधार मला सांपडला नाहीं. या पत्रव्यवहारामध्यें शिवाजीचाही निर्देश आहे आणि इतक्यावरूनच शिवाजीचा व छापखान्याचा बादरायण संबंध जोडला गेला असावा अशी मला शंका येते. शिवाजीनें छापखाना स्थापन करण्याचा प्रयत्न केला होता, असा सबळ पुरावा पुढें आल्यास त्याबद्दल माझ्या इतका अभिमान कुणालाही वाटणार नाहीं. परंतु भावनेच्या भरांत इतिहासाला पुराणाचें स्वरूप प्राप्त होणार नाहीं, याबद्दल जपावें तितकें थोडेंच आहे.

## डेनिश मिशनरी-सरफोजींचा छापखाना

हिंदुस्थानांत मुद्रणालय स्थापण्याचा तिसरा प्रयत्न डेनिश मिशनऱ्यांचा. ता. ९ जुलै १७०६ रोजीं Bartholomew Ziegenbalg व Henry Plutochau असे दोन मिशनरी हिंदुस्थानांत आले व ट्रांकेबार ( तंजावरजवळ ) येथें आपलें कार्य त्यानीं सुरू केलें. प्रथम त्यांना मोठ्या संकटांना तोंड द्यावें लागलें व पुढें हळुहळू त्यांना यश येऊन कानाबाडी नांवाच्या एका प्रसिद्ध तामीळ कवीला त्यानीं ख्रिस्तीधर्माची दीक्षा दिली. या पहिल्या प्रॉटेस्टंट मिशनऱ्याच्या मदतीला म्हणून त्यांच्या युरोपांतील धर्मबांधवांनी Jonas Finche नांवाचा मुद्रक छापखान्यासह पाठविला, परंतु तो वाटेंत केप ऑफ गुड होप येथें तापानें मरण पावला व दुसऱ्या वर्षी छापखाना तेवढा हिंदुस्थानांत आला. पण तो कसा चालवावा हें कोणास माहीत नव्हतें. इतक्यांत ईस्ट इंडिया कंपनीतील एका लष्करी शिपायाला ही कला थोडीशी अवगत होती, त्याच्या साहाय्यानें या छापखान्याची उभारणी झाली व कांहीं धार्मिक पुस्तकें रोमन लिपींत तेथें प्रसिद्ध झालीं. परंतु हीं पुस्तकें मराठी भाषेंत नव्हतीं. या मुद्रणाचा नमुना मी अवलोकन केलेला नाहीं. पण याच मिशनांतील एक धर्मोपदेशक Frederick Schwartz याच्या प्रोत्साहनानें तंजावरचे सुविद्य मराठा राजे सरफोजी यांनीं आपल्या राजधानींत एक छापखाना स्थापिला व त्यांत १८०६ सालीं छापिलेलें एकशें दहा इसापनीतिकथांचें एक सचित्र मराठी पुस्तक ब्रिटिश म्युझियममध्यें आहे. इसापनीतींचें हें भाषांतर सरफोजीचे मुख्य प्रधान सखण्णा पंडित यांनीं केलें होतें. याच छापखान्यांत मुद्रित झालेले माघ-

काव्य, कारिकावलि व मुक्तावलि हे संस्कृत ग्रंथ तंजावरच्या सरस्वतीमहाल ग्रंथसंग्रहालयामध्यें आहेत. ( The journal of the Tanjore Saraswati Mahal library, Vol. I. No. 2, 1939-40, p. 17) बहुधा याच छापखान्यांत इ. स. १८०९ मध्यें मुद्रित केलेल्या एकनाथाच्या भावार्थ रामायणाच्या युद्धकांडाच्या कांहीं प्रती याच ग्रंथसंग्रहांत आहेत. त्याच्या ४६९ पृष्ठावर मजकूर आढळतो तो असा—

श्रीमत्तंजानगर्यां विलसितनवविद्याकलानिध्यभिख्या शाला तस्यां नयोद्वाव
( ४९१० ) गत कलिशरत्कालसाये ( १७३१ ) शके च ॥
शालीवाहस्य शुक्रे सवितरि सतुले भावरामायणे युद्ध– ॥
कांडैकाकारटीकामतनुत ऋषि कुप्याख्य भट्टोर्णयन्त्रे ॥ १ ॥

छापखान्याला **अर्णयन्त्र** असें हें दुसरें अभिधान होय. **अर्ण** म्हणजे अक्षर ( उदा० 'पंचार्णो मनुरीरितः' )

## नागरी मुद्रणाचें मूलस्थान–विल्किन्स

आजच्या आपल्या मुद्रणाला उगमस्थानीं असलेला या क्षेत्रांतला महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे Sir Charles Wilkins याचा होय. यानें स्वतः बंगाली लिपीचे टाइप तयार केले होते व या टाइपांनीं Mr. Nathaniel Halhed याचें बंगाली ग्रामर १७७८ त छापण्यांत आलें. पुढें १७९५ सालीं विल्किन्सनें देवनागरीही टाइप केले. आणि त्या टाइपांनी आपलें संस्कृत भाषेचें व्याकरण छापण्यास त्यानें हात घातला. परंतु दुर्दैवानें त्याच्या कार्यालयाला एकाएकीं आग लागून टाइप बिघडून गेला. टाइपांच्या बऱ्याचशा मेट्रिसा व पंच या आगींतून बचावले ते घेऊन तो इंग्लडांत गेला व त्यांच्या साहाय्यानें पुनः टाइप पाडून त्यानें १८०८ सालीं आपलें संस्कृत भाषेचें ग्रामर मुद्रित केलें. हेच विल्किन्सचे टाइप मुंबईच्या कुरियर प्रेसनें आणले व त्यांच्या साहाय्यानें मुंबईतील आरंभीचीं १८२३ सालची विदुरनीति, १८२४ सालची सिंहासनबत्तिशी, केनेडीचे मराठी–इंग्रजी व इंग्रजी–मराठी कोश वगैरे पुस्तकें छापलीं गेलीं आहेत.

विल्किन्सनें आपले टाइप तयार करतांना ज्या कारागिरांची मदत घेतली होती त्यांना ही टाइप ओतण्याची कला अवगत झाली होती. परंतु

विल्किन्स इंग्लडांत गेल्यावर त्यांच्याकडून हें काम करून घेणारा कोणी योजक न राहिल्यामुळें ही कला नष्ट होण्याच्या बेतांत होती. इतक्यांत, १७९३ सालीं हिंदुस्थानांत आलेला मिशनरी डॉ. विल्यम कॅरे हा शुभवर्तमानाची देशी भाषांतरें छापण्याच्या विचारांत होता. त्यानें आपलें ठाणें श्रीरामपूर या डेनिश लोकांच्या वसाहतींत मांडलें होतें. त्याची व विल्किन्सचे जे हे लोहार, पंचानन व मनोहर, यांची गांठ पडली. त्यांच्या साहाय्यानें डॉ. कॅरे यांने बंगाली, नागरी, मोडीमराठी, उर्दु, गुजराती, कानडी वगैरे अनेक लिपींचे टाइप तयार केले. श्रीरामपूरच्या छापखान्यांत, मराठी ग्रामर (१८०५) मराठी-इंग्रजी कोश (१८१०) सिंहासनबत्तीशी (१८१४) हितोपदेश (१८१५) वगैरे मराठी पुस्तकें छापून निघाली. यापैकीं कांहीं आपणांस आजच्या प्रदर्शनांत पाहावयास मिळतील.

## मोडी व गुजराती

आज आपले मराठी ग्रंथ आपण बालबोध नागरींत छापतों. परंतु कॅरेचे हे ग्रंथ मोडीं लिपींत आहेत असें आपणांस दिसून येईल. बंगाली किंवा गुजराती भाषेची जशी नागरीपेक्षां निराळी अशी लिपि आहे तशी मोडी ही मराठी भाषेची स्वतंत्र लिपि होय अशी त्या काळीं परदेशी लोकांची समजूत होती. कुरियर पत्रामध्यें ज्या मराठी जाहिराती त्या काळीं छापल्या जात त्या मोडी लिपींमध्यें असत. Illustrations of the grammatical parts of Gujrathi, Mahratta and English languages या १८०८ सालीं छापलेल्या डॉ. रॉबर्ट ड्रमंडच्या पुस्तकाला मराठीकरितां मोडीच टाईप वापरलेला आपणास दिसेल. आह्मीं महाराष्ट्रीय लोक जुन्या ग्रंथाकरितां किंवा सध्यां मुद्रणाकरितां बालबोध नागरी लिपि वापरतों व पत्रव्यवहाराकरितां मोडीचा उपयोग करतों. गुजराती लोक पूर्वीं प्राचीन ग्रंथाकरितां आमच्या प्रमाणेंच मुख्यतः नागरी लिपीचा उपयोग करीत व व्यापारी किंवा इतर पत्रव्यवहाराकरितां सध्याची गुजराती लिपि वापरीत. यांनाच ते अनुक्रमें शास्त्री लिपि व महाजन लिपि असें नांव देत. वखारीच्या पत्रव्यवहारामध्यें Banian characters असा जिचा निर्देश असल्याचें मी मघाशीं सांगितलें ती ही महाजन लिपि होय. आह्मीं महाराष्ट्रीयांनीं मुद्रणाकरितां बालबोध नागरी लिपीचा अवलंब केला. परंतु गुजराथ्यांनीं मुद्रणाकरितां महाजन किंवा Bania लिपीच

कवटाळली. याचें कारण असें कीं या क्षेत्रांत ज्यांनीं प्रथम पाऊल टाकलें तो भिमजी पारखेसारखा गुजराती बनिया होता किंवा फर्दुनजी मर्झबान हा पारशी होता. गुजराती ब्राह्मण फार उशीरा या प्रांतांत शिरले. आधुनिक मराठीचे जनक असे आपल्याकडे छत्रे, घगवे, जांभेकर, क्रमवंत, फडके वगैरे ब्राम्हण लोक होते तर आधुनिक गुजराती भाषेचे जनक रणछोड गिरधर हे मोड जातीचे वाणी होते. नागरी लिपि बाजूला राहून एकदा बनिया लिपीचा गुजराती मुद्रणाकरितां प्रघात पडल्यानंतर मागाहून आलेल्या गुजराती ब्राह्मणांना ही पद्धति फिरवितां आली नाहीं. दुसरी एक गोष्ट येथें सांगितली पाहिजे ती ही कीं, गुजराती व मोडी या लिपींचा अगदीं निकट संबंध आहे. गुजराती लिपीचेच आपली मोडी हें सुधारलेलें किंवा उत्क्रांत व पूर्ण स्वरूप आहे असें मला वाटूं लागलें आहे. हेमाडपंतानी मोडी लिपि लंकेहून आणिली ही शुद्ध दंतकथा होय. हेमाडपंताच्या वेळच्या किंवा त्याच्यानंतर शंभर दिडशें वर्षांतील एकही मोडी लिपींतील लेख आढळलेला नाहीं. इ, ज, ख वगैरे मोडी व गुजराती अक्षरें सारखींच आहेत. इतकेंच नव्हे तर ज्या प्रमाणें प्रथम ओळ काढून आपण मोडी लिहितों तशीच गुजराती लिपि लिहिण्याचा पूर्वी प्रघात होता. त्याला ते " माथां बांधेला " असें म्हणतात. मुद्रणसुलभतेकरितां पुढें या ओळीला गुजराती लोकांनीं फांटा दिलेला दिसतो. परंतु शिळाप्रेसवर छापलेलीं जुनीं गुजराती पुस्तकें पाहिलीं तर तीं ओळींसह म्हणजे शीर्षबद्ध असलेलीं दिसून येतात. इतकेंच नव्हे तर ही लिपि गुजराती आहे कीं मोडी आहे हें चटकन ओळखणे देखील कठीण होतें. यासंबंधीं जास्त विचार करून मी माझें निश्चित मत विस्तारपूर्वक पुढें मांडणार आहे.

## खिळाछाप, शिळाछाप व ठोकळाछाप

सुट्या टाइपांनीं किंवा खिळ्यांनीं छापण्याच्या मुद्रणाला Typography किंवा खिळेछाप म्हणतात. याचा अल्प इतिहास आतांपर्यंत निवेदन केला. याशिवाय शिलाछाप किंवा Litho-graphy असें जिला म्हणतात ती निराळी मुद्रणपद्धति आहे. आरंभींचीं मराठी व गुजराती बरीचशीं पुस्तकें शिलाछापी आहेत. त्यामुळें पुष्कळांचा समज असा आहे कीं प्रथम शिळाछाप सुरु झाला व त्याचेंच सुधारलेलें स्वरूप म्हणजे खिळाछाप आहे. खरा प्रकार असा आहे कीं, Lithography चा शोध अलीकडे १७९६ सालीं

Stenefelder याला फोटोग्राफीचें संशोधन करतांना लागला. शिळा-छापाला टाइपांची गरज नसल्यामुळें कोणतीही लिपि किंवा चित्रेंही त्यावर छापतां येतात म्हणून ही मुद्रणपद्धति आरंभीं फार लोकप्रिय झाली. शिवाय ती स्वस्तही होती. तिसरी मुद्रणपद्धति म्हणजे Xylography. Block Printing असेंही तिला म्हणतात. अशा ठोकळाछाप पद्धतीनें नाना-फडणविसांनी गीता छापण्याचा उद्योग आरंभिला होता व तो उद्योग पुढें १८०५ चे सुमारास मिरज संस्थानचे अधिपति गंगाधर गोविंद पटवर्धन यांनीं शेवटास नेला. ही गीता ज्यावरून छापिली ते ठोकळे मिरज संस्थानांत आहेत. या गीतेच्या एका पृष्ठाचा फोटो रा. सुंदरराव वैद्य यानीं मागें 'नवयुग' मासिकांत प्रसिद्ध केला होता. ( नवयुग, जून १९१६ पृ. ६२८ )

सुटे खिळे ( movable types ) हे धातूचे ओतलेले असतात. परंतु हे धातूचे टाइप युरोपांत सार्वत्रिक उपयोगांत येण्यापूर्वी लांकडाचे टाइप कोरून कांहीं ग्रंथ तेथें मुद्रित झाल्याचें नमूद आहे. आपल्याकडें अशा प्रकारचा प्रयत्न झाला होता कीं काय हें सांगवत नाहीं. Mr. H. T. Colebrooke याचें संस्कृत भाषेचें ग्रामर कलकत्ता येथें १८०५ सालीं छापलेलें उपलब्ध आहे. ( B. B. R. A. S. ) त्यांतील नागरी अक्षरें धातूचीं ओतल्यासारखीं दिसत नाहींत, व तीं जाड व ओबडधोबड आहेत. त्यामुळें हे टाइप लाकडावर कोरलेले आहेत कीं काय, अशी एक शंका येते. हा ग्रंथ कलकत्ता येथें ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रेसमध्यें छापला होता. तज्ज्ञांनीं याचा जास्त शोध करावा.

## मुद्रणाला कर्मठांचा विरोध

मुद्रणाच्या योगेंकरून हिंदु लोकांच्या खिस्तीकरणाला मदत होईल अशा प्रकारची बुध्दि इंग्रजांच्या वखारीच्या पत्रव्यवहारांत सांपडते. हिंदुस्थानांत मुद्रण-कलेचा प्रसार प्रथम ख्रिस्ती मिशनऱ्यांनीच केला. तेव्हां आपले कर्मठ हिंदु लोक मुद्रणकलेकडे साशंकपणेंच पाहूं लागले हें स्वाभाविक आहे. श्री. गोविंद नारायण माडगांवकर हे आपल्या मुंबईवर्णनांत लिहितात, " आमचे कित्येक भोळे व नैष्ठिक ब्राह्मण छापलेल्या कागदांस स्पर्श करण्यास भीत असत. आणि अद्याप (म्हणजे १८६३ सालीं) मुंबईत व बाहेर गांवीं छापील कागदास शिवत नाहींत

व छापलेलें पुस्तक वाचीत नाहींत, असे पुष्कळ सांपडतील. " आधुनिक शिकलेले लोकही या सोवळेपणापासून अगदींच अलिप्त होते असें नाहीं. दादोबा पांडुरंग यानीं लघुकौमुदीचें मराठी भाषांतर केलें होतें. त्याचें हस्तलिखित अभिप्रायाकरितां प्रो. बाळशास्त्री जांभेकरांकडें पाठविलें असतां, " त्यांतलीं पाणिनींची अष्टाध्यायींतलीं सूत्रें हीं वेदोक्त आहेत तीं तूर्त छापून अशीं ओवळीं केलीं असतां लोकांस आवडणार नाहींत असा आपला अभिप्राय दर्शविला, " असें दादोबांनी आत्मचरित्रांत लिहिलें आहे. रा. सा. विश्वनाथ नारायण मंडलिक आंघोळ केल्यावर छापील ग्रंथाला शिवत नसत असें त्यांचे चरित्रकार रा. हवलदार लिहितात. मुद्रणाच्या शाईमध्यें कांहीं अमंगळ व वर्ज्य पदार्थ असतात, असें त्यावेळच्या लोकाचें म्हणणें होतें. म्हणून कोण्या एका प्रकाशकानें 'तुपाचें गुरुचरित्र' ( म्हणचे चरबीऐवजीं तूप घालून केलेल्या शाईनें छापलेलें ) अशी वृत्तपत्रांत जाहीरात दिली होती! गणपत कृष्णाजी सारख्या आपल्या लोकांनीं आपले स्वतंत्र छापखाने घातले आणि त्यामुळें मुद्रणाविरुद्ध लोकांचे प्रतिकूल ग्रह हळूहळू नष्ट झाले. परंतु छापील ग्रंथांच्या प्रसाराबरोबर आपल्या प्राचीन ग्रंथांच्या हस्तलिखितांच्या संरक्षणाकडें आपलें अक्षम्य दुर्लक्ष होत आहे, हेंही कबूल केलें पाहिजे. आज मुद्रित स्वरूपांत उपलब्ध असलेलीं बहुतेक प्राचीन काव्यें अशुद्ध छापलेलीं असून त्यांच्या शास्त्रीय पद्धतीनें संशोधित प्रती तयार करण्याचे वेळीं या हस्तलिखितांचें आपणास महत्त्व कळून येतें. याकरितां अशा हस्तलिखितांचा कसोशीनें संग्रह व संरक्षण झालें पाहिजे.

## ग्रंथालयचळवळ : उगम, विकास व विरोध

आपल्या ग्रंथालयपरिषदेचें हें मुंबई शहरांतील अधिवेशन यंदा १९४५ त भरत आहे व मुंबईमध्यें पहिली नेटिव जनरल लायब्ररी शंभर वर्षांमागें १८४५ तच स्थापन झाली आहे. म्हणजे यंदा आपण त्या मुंबईतील ग्रंथालयचळवळीची शताब्दीच साजरी करीत आहोंत असें म्हणावयास हरकत नाहीं. या चळवळीचा मूलारंभ तेविसाव्या नेटिव इन्फन्ट्रीचा कॅप्टन पी. टी. फ्रेंच यानें १८३८ सालीं अहमदनगर येथें केला. पुढें हेच गृहस्थ १८४९ सालीं बडोद्याला ॲक्टिंग रेसिडेंट म्हणून गेले. तेथेंही त्यांनीं या चळवळीचें बीजारोपण केलें. १८४५

सालीं मुंबई मध्यें जी नेटिव जनरल लायब्ररी स्थापन झाली तिच्या मुळाशीं याच गृहस्थाची स्फूर्ति होती असें दिसतें.

'पुण्यांत लायब्ररीची स्थापना' या मथळ्याखालीं लोकहितवादी ता. २६ मार्च १८४८ च्या "प्रभाकर" पत्रांत लिहितात, "गव्हर्नर साहेब यांनीं हिंदू लोकांचें अज्ञान दूर होण्याचा उपाय पुण्यांतच केला आहे असें नाहीं, परंतु नगरास केला आहे, व इतर ठिकाणीं जागोजागचे रेसिडेंट वगैरे अधिकारी यांस तसेंच करण्याविषयीं हुकूम पाठविले आहेत. गव्हर्नर साहेबांचे प्रायव्हेट सेक्रेटरी कपतान फ्रेंच यांनीं तसेंच करण्याची प्रवृत्ति चालू करविली, त्याबद्दल त्यांचेही फार उपकार समजले पाहिजेत". इंग्रजी राज्य ज्यावेळीं येथें स्थापन झालें, त्यावेळीं हडेलहप्पी समजल्या जाणाऱ्या लष्करातील शिपाई गड्यांनी आपल्या लोकांच्या शैक्षणिक, वाङ्मयीन व बौद्धिक उत्कर्षाला पुष्कळ हातभार लावला होता हें कर्नल व्हेन्स केनेडी, मेजर कँडी, कॅप्टन मोल्स्वर्थ वगैरे प्रसिद्ध मराठी कोशकारांच्या उदाहरणावरून दिसून येईल. मुंबई सरकारचें नेटिव लायब्ऱ्यांकडे लक्ष वेधण्यास कॅप्टन फ्रेंच याचे प्रयत्न कारण झाले व या चळवळीचा सरकारनें पुरस्कार केला. अशा प्रकारें अहमदनगर प्रमाणेंच पुणें, बेळगांव, सुरत, अहमदाबाद वगैरे ठिकाणीं नेटिव जनरल लायब्ऱ्या स्थापन झाल्या. आपल्याकडे मुद्रणकला नुकतीच अस्तित्वांत आल्यामुळें देशी भाषांतलि ग्रंथांची संख्याही पण त्यावेळीं मर्यादितच होती. या संबंधीं बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या १८५०-५१ च्या रिपोर्टांत शेरा सांपडतो तो असा,

" In the present state of Native literature and with the present scanty stock of Standand Native works, we do not expect any great degree of benefit to arise immediately; but in principle, at all events, such libraries seem calculaled to diffuse in the course of time much of the general Knowledge of Europe among the masses of Indian society. They are at the same time calculated to create a market for translators and publishers and to excite a taste for literature. " ( P. 72 )

१८५० सालीं या निरनिराळया नेटिव लायब्ऱ्यांकडून सरकारनें त्यांच्या परिस्थितीसंबंधीं रिपोर्ट मागविले होते. त्यांच्यावरून या ग्रंथालयांमध्यें पुस्तकें किती होती व तीं कोणकोणत्या भाषेंतील होतीं याची माहिती मिळू शकते. उदाहरणार्थ पुण्याच्या नेटीव लायब्ररीचे सेक्रेटरी, रा. गोपाळराव हरि देशमुख यांनीं सरकारी पृच्छेला जें उत्तर पाठविलें आहे त्यामध्यें पुणे नेटिव लायब्ररीमध्यें एकंदर १८४७ पुस्तकें असून त्यांपैकीं १६२२ इंग्रजी, १८५ मराठी व संस्कृत, आणि ५० हिंदुस्थानी, अरबी व पर्शियन होतीं, असें दिसून येतें. अमदाबाद येथील गुजराथ व्हर्न्याक्युलर सोसायटीकडून जी माहिती आली आहे तिच्यावरून या संस्थेच्या संग्रहीं इंग्रजी २५०, गुजराती १२४, मराठी ४४, पर्शियन ६, हिंदुस्थानी १, संस्कृत हस्तलिखीतें २, प्राकृत हस्तलिखितें २६, अशीं एकंदर ४५३ पुस्तकें होतीं असें आपणास कळतें. त्यावेळीं प्रसिद्ध झालेल्या मराठी किंवा संस्कृत ग्रंथांची संख्या फार नव्हती हें लक्षांत घेऊनही त्यावेळीं जी संस्कृत किंवा मराठी पुस्तकें मुद्रित झालीं होतीं तीं सगळीं या लायब्ऱ्यांमध्यें संगृहीत झालेली होतीं असें दिसत नाहीं. रा. दात्यांची मराठी ग्रंथसूचि पाहिली तर १८५० पर्यंत केवळ मराठीच पुस्तकें दोनशेंवर मुद्रित झालेलीं दिसतात. शिवाय दात्यांना उपलब्ध न झालेलीं कांहीं पुस्तकें आहेत तीं वेगळींच. यावरून मराठीमध्यें किंवा संस्कृतमध्यें मुद्रित झालेलें प्रत्येक पुस्तक आपल्याजवळ असावें अशी संग्राहक दृष्टि त्या लोकांची होती, असें वाटत नाहीं. बडोदें व अहमदनगर येथील नेटिव लायब्ऱ्यांनीं आपल्या संग्रहीं असलेल्या पुस्तकांच्या याद्याच १८५१ सालीं सरकारकडे पाठविल्या होत्या. परंतु मुंबईसरकारचा दप्तरखाना धुंडाळूनही त्या मला सांपडल्या नाहींत. मला अशी शंका आहे कीं कांहीं धार्मिक पुस्तकें छापावयाला जसा लोकांचा विरोध होता, तसा अशीं मुद्रित झालेलीं पुस्तकें सार्वजनिक ग्रंथालयांत ठेवण्यालाही तो असावा. हीं ग्रंथालयें जरी नेटिवांकरितां ह्मणून होतीं तरी त्यांच्या व्यवस्थापकमंडळांत युरोपियन लोकही असत. १८४५ मध्यें मुंबईत जी नेटिव जनरल लायब्ररी स्थापन झाली तिच्या कार्यकारीमंडळाचीं नांवेंच मी आपणास सांगतोः—

अध्यक्ष— John Mullaly

७ युरोपीयन सभासद— 1 M. F. Truman,

2 G. McKeon, 3 J. Mathieson, 4 A. R. Dickson, 5 J. King, 6 A. L. Murdock, 7 M. Groundwater.

**७ हिंदी सभासद** — १ राघोबा जनार्दन, २ पांडुरंग भाऊ, ३ नारायण अमृतराव, ४ D. P. Rodrigues, ५ पुंडलीक शंकर वर्दे, ६ बम्मनजी फर्दूनजी, ७ श्रीकृष्ण सदाशिवजी.

हीं ग्रंथालयें म्हणजे राज्यकर्त्यांच्या नादीं लागलेल्या बाडग्या लोकांचा 'अव्यापारेषु व्यापार' असाच सनातनी लोकांचा समज असावा. ग्रंथालयाविरुद्ध प्रतिकूल ग्रह अगदीं १८६७ पर्यंत कसा होता याला पुरावा आहे. गोविंद बाबाजी जोशी नांवाच्या एका चळवळ्या गृहस्थांनीं आपली रोजनिशी १८९६ सालीं छापलेली प्रसिद्ध आहे. त्यांत वसई २९–६–१८६७ ची नोंद सांपडते ती अशीः—

" वसई सोडल्यावर मी माहीम येथें गेलों... माहीम येथील सार्वजनिक कामाचे पुढारी रा. रा. धोंडुअण्णा दांडेकर यांजबरोबर तेथें पुस्तकालय स्थापन व्हावें याजबाबत जें भाषण झालें त्याचा गोषवारा खालीं देतों. ते म्हणाले कीं " लायब्ररी स्थापण्यांत काय अर्थ आहे ? पुस्तकालय असलें म्हणजे तेथें आपल्या धर्माचीं परमपूज्य पुस्तकें ठेवितील. मग तीं हवीं त्याच्या हातीं जातील. तेथें गांवांतील चटोरपोरें बसून अद्वातद्वा बडबड करतील. पानतंबाकू विड्या ओढीत बसतील. याकरितां आह्मांस लायब्ररी नको.........मी पुनः विनंति केली कीं, पोथ्या, पुराणें कोणत्याही लायब्ररींत धर्मसंबंधाचे बाबतीची नसतात. पण सांप्रत देशांत काय चळवळ चालली आहे. कोणता कायदा सरकार करीत आहे, त्यापासून रयतेस कोणकोणत्या नडी आहेत, इत्यादि गोष्टींची वर्तमानपत्रांत चर्चा होते. नवीन नवीन पुस्तकें विद्वान लोक तयार करतात, त्यांचा संग्रह करण्यास हें स्थळ फार उपयोगी पडतें. कोणी प्रतिष्ठित गृहस्थ गांवांत आला तर सर्वांनीं त्याची भेट घेण्यास, त्याच्याशीं सार्वजनिक संबंधानें बोलण्यास लायब्ररी हें फार उपयोगाचें स्थान आहे. दररोज सायंकाळीं आपण देवदर्शनास जातों तेवेळेस तेथेंही अर्धा तास गेल्यानें वर्तमानपत्रांत नवीन काय काय खबरा आहेत; व्यापारी लोकांस दररोजच्या पत्रांत जिनसाचे भाव, सोन्यानाण्याचे दर छापून येतात त्यायोगें पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे. प्रवाशाचीं

चरित्रें, मोठमोठाल्या विद्वानांची भाषणें, राजकीय चळवळीचे फेरफार, अनेक ग्रंथांवर वर्तमानपत्रांचे अभिप्राय इ. इ. अनेक विषयांचें ज्ञान पुस्तकालयाचे स्थापनेपासून होतें. तर आपल्यास सभा करून गांवांत पुस्तकालय स्थापण्याची इच्छा नसेल तर गांवांत तीन चार पत्रें येतात तीं लोकांस एक ठिकाणीं मिळतील अशी तरी कांहीं व्यवस्था करावी. परंतु तेंही त्यांस मान्य झालें नाहीं. ईश्वर इच्छा !" आतां वाचून दाखविलेल्या उताऱ्यावरून त्याकाळच्या लोकांच्या ग्रंथालयासंबंधी कल्पना व अनुकूल किंवा प्रतिकूल ग्रह याची आपणांस थोडीशीं माहिती होईल.

## Incunabula.

शंभर वर्षांमागें भूतकाळाच्या उदरांत बुडी मारतां आल्यास आपणास त्याकाळचें मराठी ग्रंथसंग्रहालय कसें दिसलें असतें, त्याची थोडीबहुत कल्पना आजचें प्रदर्शन पाहून आपणास होईल. कारण या प्रदर्शनांत १८४५ पर्यंत मुद्रित झालेलीं पुस्तकें ठेवण्यांत आलेलीं आहेत. मराठी मुद्रणाचा हा पाळणाच असें म्हणावयास हरकत नाहीं. युरोपांमध्यें या आद्यमुद्रितांना Incunabula असें म्हणतात. Cunae म्हणजे लॅटीन भाषेंत पाळणा. त्यावरूनच Incunabula हा शब्द सिद्ध झाला आहे. संस्कृत भाषेमध्ये पाळण्याला दोला म्हणतात. तेव्हां Incunabula चें "दोला मुद्रित" असें मराठी नामकरण करतां येईल. युरोपांत पंधराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मुद्रणकला अस्तित्वांत आली. अर्थात इ. स. १५०० पूर्वी जीं पुस्तकें मुद्रित झालीं तीं सगळीं Incunabula किंवा दोलामुद्रितें या सदराखालीं यावीं असें पाश्चात्यांनीं ठरवून टाकलें आहे. अशा युरोपातील जुन्या नव्या निरनिराळया भाषांतील एकंदर दोलामुद्रितांची संख्या २०००० भरेल, असा तज्ज्ञांचा अंदाज आहे. Hain यानें आपल्या Repertorium Bibliographicum या ग्रंथांत अशा पंधराव्या शतकांत मुद्रित झालेल्या १६,२९९ ग्रंथांची यादी दिली आहे व त्यामध्यें Dr. Copinger यानें नंतर पुष्कळच भर घातली आहे. पंधराव्या शतकांत प्रत्येक ग्रंथाच्या तीनशेंपेक्षां जास्त प्रती क्वचितच छापीत, असें म्हणतात. हीं दोलामुद्रितें मिळविण्याकरितां युरोपांतील कैक ग्रंथप्रेमी संग्राहकांनीं गेल्या चारसाडेचार शतकांत दिवसरात्र खपून हजारों पौन्ड खर्च केले आहेत.

त्यांनीं जमविलेलीं हीं पुस्तकें युरोपांतील निरनिराळ्या ब्रिटिश म्युझियम-सारख्या प्रख्यात ग्रंथसंग्रहालयांत अढळ स्थान मिळवून बसलीं आहेत. त्यामुळें अशा प्रकारचे आणखी दोलामुद्रित ग्रंथ आज उपलब्ध होणें शशशृंगा इतकेंच अशक्य झालें आहे.

## मराठी दोलामुद्रितें.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं ख्रिस्तपुराणासारखा मराठी ग्रंथ जरी गोमंतकांत मुद्रित झाला तरीपण तो रोमन लिपीमध्यें असल्यामुळें मराठी मुद्रणाचा खरा जन्मकाल एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीला झाला असें मानलें पाहिजे. १५००ही जशी युरोपामध्यें Incunabula ठरविण्याची मर्यादा ठरली आहे त्याप्रमाणें आपल्याकडील दोलामुद्रिताची मर्यादा १८५० हें साल ठरवावी हेंच मलाही योग्य वाटतें. अशा प्रकारच्या १८५० च्या मागच्या मराठी मुद्रितांची संख्या एकाच पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या वगळल्यास तीनशे साडेतीनशें पेक्षां जास्त भरेल असें वाटत नाहीं. आतां पासूनच जर आह्मीं कसोशीने प्रयत्न केले तर निरनिराळ्या खासगी संग्रहांत दडी मारून बसलेल्या या वाङ्मयधनाचा शोध व बचाव करता येण्यासारखा आहे. "ठोका म्हणजे उघडेल व शोधा म्हणजे सांपडेल" हा ख्रिस्ताचा उपदेश आपण येथें अवश्य लक्षांत ठेवला पाहिजे. युरोपामध्यें कोणतेंही महत्वाचें पुस्तक सहसा नष्ट होत नाहीं. तेथें पुस्तकविक्रीची व लिलावांची पद्धति इतकी कार्यक्षम आहे कीं प्रत्येक पुस्तकाचें योग्य मूल्यमापन होऊन तें शेवटीं सुरक्षित स्थळींच जाऊन पडतें. आपल्या इकडे सगळाच अडाणी कारभार! इकडे एकाद्या ग्रंथप्रेमी माणसाच्या संग्रहीं दुर्मिळ पुस्तक असल्यास त्याच्या निधनानंतर त्याच्या वंशजास त्याचें महत्त्व ठाऊक नसल्यामुळें त्याची योग्य काळजी घेतली जात नाही व एक तर तें कसरीच्या किंवा वाळवीच्या भक्षस्थानीं पडतें किंवा जरीपुराणवाल्याच्या हातांत जाऊन पिंजरीच्या किंवा चिवड्याच्या पुड्या बांधण्यांत त्यांचा उपयोग होतो! सेकंडहँड पुस्तकाच्या दुकानांची आपल्याकडे अलीकडे चलती आहे. परंतु शाळाकॉलेजांचीं पाठ्यपुस्तकें किंवा फार तर चालू नाटकें व कादंबऱ्या यांच्या-पलीकडे त्यांची दृष्टि नसते. मागणी नाही म्हणून हे लोक दुर्मिळ पुस्तकांचा संग्रह व पुरवठा करीत नाहीत एवढेंच कांहीं नाहीं. ज्या लोकांच्या हातांत हा धंदा आहे त्यापैकीं पुष्कळांची त्यांचें महत्त्व जाणण्याची बौद्धिक ताकद नसते.

-अ. का. प्रियोळकर

युरोपांत किंवा अमेरिकेंत जे ब्रिटिश म्युझियमसारखे प्रचंड ग्रंथसंग्रह आहेत, त्यांचा जर इतिहास पाहिला तर अनेक ग्रंथसंग्राहकांच्या अविरत परिश्रमाचें कैक वर्षांचें तें अंतिम फल आहे, असें दिसून येतें. अनेक ओहळ व नद्या मिळून जसा सागर होतो त्याप्रमाणें अनेक वैयक्तिक ग्रंथसंग्रह मिळून हीं सार्वजनिक विराट संग्रहालयें बनलीं आहेत. आपल्याकडे ग्रंथसंग्रह करण्याची शास्त्रीय दृष्टि तर जवळ जवळ नाहींच असें म्हणावयास हरकत नाहीं. लोक शक्य तोंवर पुस्तकें विकत घेत नाहींत आणि घेतलीं तरी त्यांचा व्यवस्थित संग्रह करीत नाहींत. दुर्मिळ जुनीं पुस्तकें गोळा करण्याचा नाद तर लाखांत एकालाही नसतो. पुस्तकें ठेवायाला जागाच नाहीं अशी त्यांची नेहमी तक्रार असते. ज्यांच्या अन्तःकरणांत ग्रंथांना जागा आहे त्यांच्या घरांत ती खचित मिळाली पाहिजे. जॉन मोर्ले आपल्या On the study of literature या निबंधांत म्हणतो, " Pattison ( Mark ) said that nobody who respected himself could have less than 1000 volumes. He pointed out that you can stock 1000 octavo volumes in a book-case that shall be 13 feet by 10 feet, and six inches deep and that everybody has that small amount of space at disposal ".

इंग्लंड वगैरे देशांत जे Bibliophile म्हणजे पुस्तकप्रेमी होऊन गेले त्यांनीं गेल्या साडेचारशें वर्षांत जे ग्रंथ गोळा करण्याचें कार्य केलें त्याच्या हकीकती ग्रंथरूपानें प्रसिद्ध आहेत. त्या वाचून या लोकांच्या आवडीचें, चिकाटीचें व त्यागबुद्धीचें कौतुक वाटतें. इंग्लडांत पुरुषांप्रमाणें बायकांमध्येंही ग्रंथ जमविण्याचा नाद आहे. अशापैकी जुन्यांतली जुनी बाई Miss Richardson Currer ( १७८५-१८६१ ) या होत. याच सुमारास Mr. Richard Heber हा एक मोठा ग्रंथसंग्राहक होता. De Ricci नांवाचा लेखक लिहितो, " Richard Heber at one time contemplated marrying her; was he more interested in the lady, or in her books ? " आमच्याकडील प्रेमवीर एकाद्या तरुणीच्या बँकबुकाशिवाय तिचीं इतर बुकें पाहून तिच्याशीं विवाह करण्यास तयार होतील हें शक्य नाहीं! युरोपांत जे ग्रंथसंग्राहक

आहेत त्यांत सामान्य हौशी लोकांप्रमाणें सरदार व राजघराण्याचे पुरुषही आहेत. त्यापैकीं पुष्कळांनीं याकरितां हजारो पौंड खर्च केलेले आढळून येतात. आपल्याकडे त्यांच्या प्रमाणें ग्रंथसंग्रह होत नाहीं याचें कारण त्यांच्या प्रमाणें आपल्याकडें पैसे नाहींत हें नसून त्यांना असलेली हौस आपल्यामध्यें नाहीं हेंच होय. तिकडील पुस्तकांच्या मूल्याची आपणास कल्पना येण्याकरितां दोनतीन अलिकडील उदाहरणें देतों. कारण शर्यतीच्या घोड्याकरितां लाखांनी रुपये खर्च होत असल्याचें जसें आपण ऐकतां तसें ग्रंथांच्या धंद्यांतही लोक खर्च करणारे आहेत, या गोष्टी आपल्या सहसा कानावर पडत नाहींत.

( १ ) Henry Yates Thomson यानें आपल्या ग्रंथांपैकीं कांहीं पुस्तकें लिलावानें विकावयाला काढलीं व १९१९ ते १९२१ या वर्षांत त्यांचे तीन सेल झाले. या पैकीं पंचाहत्तर हस्तलिखितें व पंचवीस मुद्रितें ( Vellum म्हणजे कातड्यावर छापलेलीं ) दीडलाख पौंडाना विकलीं गेलीं व नंतर त्यानें विक्री थांबविली.

( २ ) Richard Bennet नांवाचा मँचेस्टर येथील एक ग्रंथसंग्राहक केवळ दोलामुद्रितें व हस्तलिखितेच गोळा करीत असे. याच्या संग्रहांतील ५५९ दोला मुद्रितें व १०७ सचित्र कातडी हस्तलिखितें J. Pierpont Morgan नांवाच्या न्यूयॉर्क येथील हौशी ग्रंथप्रेमी गृहस्थानें १४०,००० पौंडांना विकत घेतलीं.

( ३ ) ता. २९ जुलै १९२९ रोजीं Sotheby यांने " Luttrell Psalter " व " Bedford Horae " या दोन सुप्रसिद्ध इंग्लिश हस्तलिखितांचा लिलांव लावला. या पैकीं पहिलें ब्रिटिश म्युझियमच्या ट्रस्टींनीं ३१५.०० पौंडांना विकत घेतलें व दुसरें Mr. Pierpont Morgan यांनें ३३००० पौंड देऊन हस्तगत केलें.

आह्मीं गरीब, पण आमचीं हस्तलिखितें व पुस्तकें तरी आमच्याकडून भारी किंमत कुठें मागतात ? जागरूक राहिलों तर चार आठ आण्यांत दोला मुद्रितें व दोन चार रुपयांत हस्तलिखितें आपल्याकडे पुष्कळ मिळूं शकतात. फुटपाथावरच्या धुळींतून, चोरबाजारच्या चिखलांतून व निष्काळजी लोकांच्या घरांतील कसर व वाळवी यांच्या तोंडांतून आपला उद्धार व रक्षण करा, अशी तीं सारखीं

आक्रंदत असतात. त्यांची हांक कानानें श्रवण करावयाची नसून उघड्या डोळ्यानें ऐकावयाची असते. पण तिच्याकडे लक्ष देतो कोण ?

आज आमच्या पारतंत्र्यांतील दुःस्थितीमुळें पोटच्या पोरांचा देखील आह्मांला कंटाळा आहे व त्यामुळें स्वतंत्र देशांतील हे विद्येचें छंद आपणास सुचत व रुचत नाहींत, हें खरेंच आहे. पण ज्यावेळीं आपल्याला स्वातंत्र्य मिळून आपला देश धनधान्यसंपन्न होईल व विद्या हेंच एकमेव आपलें व्यसन होईल त्यावेळीं आज दोन आण्यांला मिळणारीं दोलामुद्रितें दोनशें रुपयांना मिळणार नाहींत आणि दोन रुपयांच्या हस्तलिखिताला दोन हजार रुपये पडतील.

## ग्रंथसंग्रह कसा करावा

आज उघडण्यांत येणाऱ्या प्रदर्शनांत ठेवण्यांत येणारीं पुस्तकें दोलामुद्रितें या सदराखालीं येणारीं असल्यामुळें त्यांच्या संबंधीच मी आतांपर्यंत विशेष बोललों. दोलामुद्रितें ही एक ग्रंथसंग्रह करण्याची कालविशिष्ट दृष्टि झाली, परंतु ग्रंथसंग्राहकाला आणखी अनेक दृष्टींनीं आपल्या आवडीप्रमाणें संग्रह करतां येईल. त्यापैकीं होतकरू संग्राहकांच्या मार्गदर्शनाकरितां कांहीं दृष्टिकोण सांगतों :

**हस्तलिखितें**--यांत प्राचीन व अर्वाचीन असे भेद आहेत. १९ व्या शतकाच्या पूर्वींचीं काव्यें व बखरी व इतर कागदपत्र यांना प्राचीन असें ह्मणतां येईल. यापैकीं स्वतः कवीच्या हातचीं अशीं हस्तलिखितें विरळाच सांपडतात; पण स्वतः कवीचीं नसलीं तरी कवीच्या काळाला जवळ अशीं हस्तलिखितें मिळालीं तरी त्यांनाही फार महत्त्व आहे. मुद्रणकला अस्तित्वांत आल्यानंतर स्वतः लेखकाच्या हातच्या लिखितांनाच महत्त्व राहिलें आहे. उदाहरणार्थ गीतारहस्याचें टिळकांच्या हातचें मूळ हस्तलिखित कोणत्याही ग्रंथसंग्रहालयाला बहुमोल असा ठेवाच वाटेल. त्यांत आधुनिक प्रसिद्ध लेखकाचें एकादें हस्तलिखित जर अप्रकाशित असेल तर त्याचें महत्त्व विशेष आहे, हें निराळें सांगण्याचें कारण नाहीं. दादोबा पांडुरंग यांच्या " माबाईच्या ओव्या " हें अशापैकीं एक हस्तलिखित आहे.

**व्यक्तिविशिष्टसंग्रह**--म्हणजे एकाद्या ग्रंथकाराचे सर्व मुद्रित ग्रंथ किंवा लेख गोळा करणें. यांत स्वतः ग्रंथकाराच्या कृतींप्रमाणें त्याच्या संबंधी लिहिलेले ग्रंथ किंवा मासिकें किंवा वृत्तपत्रें यामध्यें प्रसिद्ध झालेले लेख यांचाही

समावेश करतां येईल. व्यक्तिविशिष्ट ग्रंथ गोळा करतांना एकाच ग्रंथाच्या निरनिराळ्या प्रकाशकांनीं काढलेल्या प्रती किंवा एकाच प्रकाशकानें काढलेल्या निरनिराळ्या आवृत्त्या यांचा संग्रह झाला पाहिजे. अशा दृष्टीनें ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम, सोहिरोबा वगैरे प्राचीन किंवा छत्रे, जांभेकर, हरि केशवजी, तर्खडकर, माडगांवकर, लोकहितवादी, बाबा पदमनजी, फुले, गुंजीकर, चिपळुणकर, हरिभाऊ आपटे, गडकरी वगैरे अर्वाचीन साहित्यसेवकांचें साहित्य जमा झालें पाहिजे. हें काम त्या त्या लेखकांच्या वंशजांनींच मुख्यतः केलें पाहिजे. महाराष्ट्रांतील ज्ञातिसंस्थानांही अशा दृष्टीनें आपआपल्या ज्ञातींतील साहित्यभक्तांचा ग्रंथसंग्रह जमा करतां येईल. किंवा एकाद्या व्यक्तीचें स्मारक म्हणून जर संस्था असेल तर त्या संस्थेच्या संग्रहीं त्या लेखकाचे व त्या लेखकासंबंधींचें सर्व वाङ्मय संगृहित होणें अवश्य आहे. अशा प्रकारचें एकाद्या महाराष्ट्रीयाचें मुंबईतील स्मारक माझ्या दृष्टीपुढें नाहीं; परंतु एल्फिन्स्टन किंवा विल्सन यांचीं स्मारकें म्हणून जीं दोन कॉलेजें मुंबईंत आहेत, त्यांत या थोर व्यक्तीचे सर्व ग्रंथ संगृहित करण्याची दृष्टि मला दिसली नाहीं. युरोपांतील चॉसरसोसायटीसारख्या संस्थांप्रमाणें आपल्या इकडे आपल्या जुन्यानव्या साहित्यसेवकांचीं अभ्यासमंडळें स्थापन होऊन तेथें त्यांच्या वाङ्मयाचा संग्रह झाला पाहिजे.

**विषयविशिष्टसंग्रह**—म्हणजे काव्य, इतिहास, कादंबरी, रसायनशास्त्र वगैरे विषयापैकीं एकाद्या विषयावरील आपल्या आवडीप्रमाणें आतांपर्यंत प्रसिद्ध झालेले सगळे ग्रंथ मिळविणें. व्यक्तिविशिष्ट किंवा विषयविशिष्ट ग्रंथ जमवितांना त्यांपैकीं एकादा जर परभाषेंतून भाषांतरित किंवा रूपांतरित असेल तर तो मूळ परभाषेंतील ग्रंथही शक्य तर हस्तगत करावा, किंवा आपल्या मराठी ग्रंथांचीं भाषांतरें इतर भाषेंत झालीं असतील तर तींही संगृहित करावीं.

**मुद्रणालयविशिष्टसंग्रह**—युरोपांत जुन्या प्रसिद्ध छापखान्यांत छापलेले एकंदर ग्रंथ गोळा करण्याची ग्रंथसंग्राहकांची अहमहिका लागलेली असते. अशा ग्रंथांना Aldines, Caxtons, Elzevirs, अशीं तिकडे त्यांच्या मुद्रकांवरून नावें मिळालीं आहेत. कॅरे, गणपत कृष्णाजी, आर प्रेरा, क्युरियर, अशांसारख्या जुन्या छापखान्यांतील जास्तींत जास्त मुद्रितें आपल्याकडे आहेत,

असें सांगण्यास आम्हांला भूषण वाटलें पाहिजे. निर्णयसागरसारख्या विद्यमान मुद्रागारांतील एकूणएक मराठी ग्रंथ आपल्याजवळ आहे, असें कितीशा ग्रंथ-संग्राहलयांना सांगतां येईल ? आजच त्या छापखान्यांत छापलेले कितीतरी ग्रंथ दुर्मिळ झाले असून त्यांच्या नव्या आवृत्यादेखील निघणें शक्य दिसत नाहीं.

**पहिल्या प्रती किंवा एडिशन्स**—कांहीं लोकप्रिय ग्रंथांच्या अनेक आवृत्त्या निघत असतात, आणि नव्या येऊं लागल्या म्हणजे जुन्या नष्ट होतात, किंवा जुन्या नष्ट होतात म्हणूनच नव्या येतात असें म्हणतां येईल. पुढें या ग्रंथांची पहिली प्रत दुर्मिळ होते. शेक्सपियरच्या पहिल्या फोलियो एडिशनला आज यामुळेंच विलक्षण मूल्य आहे. आपल्या इकडे दादोबांचें मोठें किंवा लघु व्याकरण; नवनीत, सौभद्र, शाकुंतल किंवा रामराज्यवियोग अशीं नाटकें; हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या, अशा ज्या ग्रंथांच्या कैक आवृत्त्या निघाल्या आहेत त्यांच्या पहिल्या आवृत्त्या पहावयास मिळत नाहींत. युरोपांत या पहिल्या आवृत्या जमविण्याचाही लोकांमध्यें विलक्षण छंद आहे. तसा नाद आपल्या लोकांनीं लावून घेतला पाहिजे. पुष्कळदा नंतरच्या आवृत्तींमध्यें इतर लोक पुष्कळ फेरफार करतात आणि मूळ ग्रंथकाराच्या कौशल्याची आपणास त्यावरून निश्चित कल्पना होत नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तर ग्रंथकाराच्या हयातींत त्याच्या ग्रंथाची जी शेवटची आवृत्ती प्रसिद्ध होते तिला फार महत्त्व आहे. मात्र ती स्वतः सुधारून त्याच्याच देखरेखीखालीं प्रसिद्ध झाली असली पाहिजे. उदाहरणार्थ दादोबाचें मोठें व्याकरण घेऊं. या व्याकरणाची पहिली आवृत्ती १८३६ सालीं प्रसिद्ध झाली. प्रत्यक्ष उपयुक्ततेच्या दृष्टीनें तिला महत्त्व नाहीं. पण त्या ग्रंथाच्या किंवा मराठी व्याकरणाच्या उत्क्रांतीच्या इतिहासाच्या दृष्टीनें आहे. त्यांची खरी महत्त्वाची आवृत्ती ७ वी. ती १८७९ सालीं प्रसिद्ध झाली. त्यांच्या निधनानंतर त्यांच्या व्याकरणाच्या ज्या चार आवृत्त्या निघाल्या त्यांत पुष्कळांनीं हात फिरविला असल्यामुळें दादोबांचें व्याकरण या दृष्टीनें त्यांना विशेष महत्त्व नाहीं. ग्रंथसंग्रहालयांत प्रत्येक ग्रंथाची प्रत्येक आवृत्ती संगृहित झाली पाहिजे. नवी आवृत्ति आल्यावर मागची काढून टाकणारे लोक नालायक म्हटले पाहिजेत.

**मासिकें व वृत्तपत्रें**— जुने ग्रंथ आज पुष्कळ मिळू शकतात, परंतु त्या मानानें जुनीं मासिकें मिळत नाहींत, आणि ज्या मानानें मासिक मिळतात त्या मानानें जुनीं वृत्तपत्रें उपलब्ध नाहींत. त्यामुळें जुन्या मासिकांतल्या व वृत्तपत्रांच्या फायलींना फार महत्त्व आहे. दर्पण, प्रभाकर, धूमकेतु, ज्ञानोदय--फार काय पण अलीकडील निबंधमालेचे किंवा सुधारकासारख्या पत्राचे मागील अंकही कुठें पहावयास मिळत नाहीत. तरी असे अंक जेवढे मिळतील तितके आस्थापूर्वक गोळा केले पाहिजेत.

**छोटीं चोपडीं**-- प्रभातफेरीचीं गाणीं, मेळ्याचीं पदें किंवा राजकीय किंवा धार्मिक वादाच्या वेळीं निघालेलीं चार आठ पानाचीं चोपडीं किंवा अशाच प्रकारचीं छोटीं छोटीं पुस्तकें किंवा पत्रें ( Tracts व pamphlets ) यांचाही संग्रह झाला पाहिजे. त्यांच्यामध्यें पुष्कळ इतिहास भरलेला असतो. मोठीं लठ्ठ पुस्तकें टिकतात, पण हीं छोटीं अल्पजीवि असतात. लंडन येथील एक बुकसेलर George Thomson यानें १६४० ते १६६१ या काळांत जमविलेलीं विशेषतः राजकीय व टीकात्मक स्वरूपाचीं तेवीस हजार चोपडीं व पुस्तकें कालानुक्रमें त्यानें दोन हजार खंडांत बांधलीं होतीं, व तीं १७६२ सालीं तिसऱ्या जॉर्जनें विकत घेऊन ब्रिटिश म्यूझियमला अर्पण केलीं. इतिहासलेखक या संग्रहाला फार महत्त्व देतात. ग्रंथशास्त्रदृष्ट्या पुस्तक चार पानाचें असो किंवा चार हजार पानाचें असो त्यांची नोंद व संग्रह सारख्याच आस्थेनें केला पाहिजे. किंबहुना मोठ्या पुस्तकापेक्षां लहान पुस्तकालाच जास्त जपलें पाहिजे.

**स्वाक्षरीचीं किंवा भेटीचीं पुस्तकें**—एखादें पुस्तक छापखान्यांतून बाहेर पडल्यानंतर तें कोण–कोणाच्या हातांतून गेलें हें त्यावर असलेल्या सह्यांवरून किंवा शेऱ्यांवरून कळतें. या त्या पुस्तकाच्या वैयक्तिक इतिहासाला ग्रंथशास्त्रज्ञानीं "Pedigree" ( वंशपरंपरा ) असें नांव दिलेले आहे. मराठी व्याकरणकार दादोबा पांडुरंग यांनीं आपली यशोदापांडुरंगी ही केकावलीवरील टीका प्रेमचंद रायचंद यांना अर्पण केली होती, ती त्यांच्या Autograph ची प्रत मजजवळ आहे. किंवा शंभरवर लहान मोठीं मराठी पुस्तकें ज्यांनीं लिहिलीं ते मराठी ख्रिस्ती लेखक बाबा पदमनजी यांनीं

राजारामशास्त्री भागवतांना दिलेली ‘ अनुभवसंग्रह ’ या स्वतःच्या पुस्तकाची प्रत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत आहे. चाळीस पंचेचाळीस वर्षांपूर्वी इंग्लंडमध्यें सुप्रसिद्ध Sotheby यांच्याकडे दोन बायबलच्या प्रती लिलावांकरितां आल्या. एकावर शेक्सपियरची व दुसऱ्यावर कवि बर्न्स याची सही होती. शेक्सपियरच्या सहीच्या अस्सलपणासंबंधी थोडी शंका असल्यामुळें त्याचे २१० पौंडच आले व बर्न्सच्या सहीची प्रत १५६० पौंडांना विकली गेली. यावरून अशा पुस्तकाला तिकडे केवढें महत्त्व देतात हें आपणांस कळून येईल.

**प्रसिद्ध पुरुषांचा पत्रव्यवहार**-- राजकीय, धार्मिक, शैक्षणिक, वगैरे निरनिराळ्या क्षेत्रात जे जुने किंवा नवे लोक प्रसिद्ध होऊन गेले त्यांनीं आपल्या मित्रांना किंवा इतर कार्यकर्त्यांना पाठविलेलीं पत्रें महाराष्ट्रभर हजारों पसरलीं असतील. तीं जर एकत्र गोळा करतां आलीं तर त्यामुळें मोठेंच कार्य होणार आहे. नाहींतर तीं सगळीं पत्रें काळाच्या भक्षस्थानीं पडतील व त्यांत समाविष्ट असलेल्या वैयक्तिक व सार्वजनिक इतिहासाला महाराष्ट्र आंचवेल. अशाप्रकारचीं खासगी किंवा ऐतिहासिक पत्रें जमविण्याचा नाद युरोपामध्ये फार आहे. William Upcott ( १७७९-१८४५ ) व त्याचा प्रतिस्पर्धि Dawson Turner ( १७७५-१८५८ ) यांनीं अनुक्रमें ३२००० व ४०००० अशा प्रकारचीं पत्रें गोळा केलीं होतीं. त्यापैकीं बरचिशीं ब्रिटिश म्युझियमनें विकत घेतलीं. हें कार्य आमच्याकडे एखाद्या व्यक्तीपेक्षां मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय किंवा मुंबई युनिव्हर्सिटीसारख्या संस्थेनें हातीं घेतल्यास त्यांना जास्त यश येईल. रावबहादूर गोपाळराव हरि देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांचें एक चरित्र रा. कृष्णाजी नारायण आठल्ये यांनीं १९२६ सालीं लिहिलें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत ते लोकहितवादीच्या पत्रव्यवहारासंबंधी लिहितात, “ कागदपत्रांचा संग्रह इतका विपुल पहावयास मिळाला कीं त्यामुळें किती लिहावें व काय लिहावें असें आह्मांस होऊन गेलें. बरेच लिहिलेले ग्रंथ छापावयाचे राहिलेले होते. त्याचीही विषयवारी लावली. अण्णासाहेबांच्या विलायतेहून आलेल्या पत्रांची फाईल, शामजी कृष्णवर्मांचीं पत्रें, संस्थानिकांचीं पत्रें, युरोपियन अमलदारांचीं पत्रें, हीं तर महत्त्वाचीं आहेतच, पण त्यांच्या प्रत्येक मुलाचीं पत्रेंही फार वाचण्यासारखीं आहेत. त्या सर्वांचीं

३१ दप्तरें अनुक्रमणिकेसहवर्तमान तयार करून ठेविलीं." हा सगळा पत्रव्यवहार आहे कोठें याचा शोध करून तो जतन करून ठेवला पाहिजे. या पत्रव्यवहारांत दयानंद सरस्वति, सार्वजनिक काका, विष्णुशास्त्री पंडित, विष्णु कृष्ण चिपळुणकर, महादेव गोविंद रानडे, रामचंद्र भिकाजी गुंजीकर, पंडिता रमाबाई, नीलकंठ जनार्दन कीर्तनें वगैरे निरनिराळ्या सुप्रसिद्ध पुरुषांचीं पत्रें होतीं असें सांगून "ह्यांपकीं कितीएक पत्रव्यवहार इतका लांबलचक, तत्कालीन स्थितीचा बोधक व नवी नवी माहिती देणारा आहे कीं, तो सर्व छापून काढल्यास एक मोठा उपयुक्त ग्रंथ होईल" असेंही आठल्यांनीं म्हटलें आहे. मंडलिकांच्या जवळच्या अशाच प्रकारच्या पत्रव्यवहाराची कल्पना रा. हवालदारांनीं लिहिलेल्या त्यांच्या चरित्रावरून होते. परंतु आतां तो सर्व नष्ट केला आहे, असें त्यांच्याकडून कळतें. तरी असे जे जे पत्रव्यवहार उपलब्ध असतील त्यांचा शोध व संग्रह करणें अत्यंत महत्त्वाचें काम आहे.

**चित्रपटपुस्तिका**--अलीकडे सिनेमांचीं जीं छोटीं छोटीं पुस्तकें प्रसिद्ध होतात, त्यांचा संग्रह ग्रंथालयामध्यें कोणी करीत नाहीं. तरीपण तोही वाङ्मयाचाच एक नवा प्रकार मानावा लागेल व म्हणून मराठी भाषेंतील चित्रपटांच्या या पुस्तिकांचा संग्रह आपल्या ग्रंथालयांत होणें जरूर आहे.

**न्यायकोर्टांत प्रविष्ट झालेलीं पुस्तकें**--ज्या पुस्तकांनीं आपल्या जनकावर कोर्टाच्या पायऱ्या चढण्याचा प्रसंग आणलेला आहे, अशा पुस्तकांचा संग्रह वकिलीच्या धंद्यांतील ग्रंथप्रेमी तर जरूर करील. उदाहरणार्थ रा. जवळकरांचे 'देशांतील दुष्मन्', व रा. तुळजापुरकरांचें ' माझें रामायण. '

**बंदिवासांतील पुस्तकें**--तुरुंगांत लिहिलेल्या पुस्तकांना हिंदुस्थानासारख्या परतंत्र देशांत सुपीक क्षेत्र असतें. अशा प्रकारच्या पुस्तकाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे लो. टिळकांचें गीतारहस्य होय. स्वतः श्रीकृष्णाचा जन्म बंदिशाळेंत झाला तेव्हां त्याच्या गीतेचें रहस्य उकलण्यास तुरुंग हेंच उत्कृष्ट स्थान होय यांत शंका नाहीं ! अलीकडील राजकीय आंदोलनांत अशीं पुष्कळ पुस्तकें जन्मास आलीं आहेत. बॅ. सावरकरांचें ' गोमंतक 'काव्य हेंही तुरुंगवासाचें फल आहे. तुरुंगांत असतांना लिहिलेलीं व तुरुंगवासासंबंधी लिहिलेलीं असे तुरुंग-

वाङ्मयाचे दोन भेद पाडतां येतील व एकाद्या संग्राहकास त्यांचा संग्रह करतां येईल.

**रद्द मजकुराचीं पुस्तकें**—( Cancells ) पुष्कळ वेळां पुस्तक छापून झाल्यावर त्याचीं कांहीं पृष्ठें रद्द करावीं लागतात व पुष्कळ वेळां त्या जागीं नवा मजकूर घालावा लागतो. याला अनेक कारणें असूं शकतील. पुस्तकांतील कांहीं विधानांनीं लोक प्रक्षुब्ध होऊन पुस्तकाचीं पानें कापून टाकणें भाग झाल्याचें एक उदाहरण म्हणून डॉ. केतकरांच्या ज्ञानकोशांतील महंमदप्रकरणाचा निर्देश करतां येईल. पुस्तक छापून झाल्यावर त्यांतील मजकूर राजद्रोहात्मक आहे, असें एकाद्यानें नजरेस आणल्यावर लेखक किंवा प्रकाशक आपण होऊन कांहीं मजकूर रद्द करतो. भारतवर्षीय नररत्नमाला ( भा. १ ) म्हणून वाई येथें १९०४ सालीं प्रसिद्ध झालेलें एक पुस्तक आहे. त्यांत बद्रुद्दिन तय्यबजीच्या चरित्राच्या प्रास्ताविक भागांत लेखक सरकारवर घसरला आहे अशा कांही प्रती सांपडतात, तर याच पुस्तकाच्या कांहीं प्रतींत त्या चरित्राच्या प्रास्ताविक भागांत राजकर्त्यांची स्तुति आढळते ! चुकलेला मजकूर सुधारण्याकरिता किंवा शिक्षणखात्यांत मंजूर होण्याकरितां जुना मजकूर रद्द करून नवीं पानें घालतात. पण कांहीं प्रती या पूर्वीच बाहेर गेलेल्या असतात. त्यांना संग्राहक लोक फार चाहातात. अर्थात् त्यांचें महत्त्व कळून येण्याकरितां दोनही प्रकारच्या प्रती जवळ ठेवाव्या लागतात.

**निरनिराळ्या लिपींतील मराठी पुस्तकें**—नागरी लिपि जरी मराठी मुद्रणाकरितां सर्वमान्य असली तरी पण मोडी, रोमन, कानडी या लिपींमध्येंही मराठी ग्रंथ मुद्रित झाले आहेत. कॅथोलिक ख्रिस्त्यांचे जुने सर्व ग्रंथ रोमन लिपींत आहेत. कॅरेचे ग्रंथ मोडीमध्यें आहेत पण आपल्याकडचेही कांहीं ग्रंथ मोडीमध्यें लिहिलेले आढळतात. उदाहरणार्थ—धनुर्धारीकृत मराठ्यांचा पत्रबद्ध इतिहास ( १८९३ ) व नलाख्यानाची बखर ( १८५७ ). कर्नाटकामध्यें तिकडील मराठी बोलींतील वाङ्मय कानडी लिपीमध्यें मुद्रणनिविष्ट केलेलें आढळतें. तंजावरकडे तेलगु किंवा तामीळ लिपीमध्यें मराठी ग्रंथ छापले जाणें शक्य आहे. तेव्हां अशा अन्य लिपींतील मराठी ग्रंथ गोळा करणें मौजेचें ठरेल.

**बृहन्महाराष्ट्राबाहेर छापलेलीं मराठी पुस्तकें**--महाराष्ट्राबाहेर किंवा हिंदुस्थानाबाहेर मुद्रित झालेलीं मराठी पुस्तकें कुतूहलजनक नाहींत काय ? " रसातळची मराठी भाषा " या मथळ्याखालीं चिपळूणकरांनीं आपल्या निबंधमालेंत ( फेब्रु. १८७५ ) ' मरे आणि लानमन ' या कंपनीनें न्यू यार्क-मध्यें छापलेल्या पुस्तकाची चेष्टा करून त्याला अमर केलें आहे. वास्तविक हें औषधांच्या जाहिरातीचें क्षुद्र चोपडें; परंतु चिपळूणकरांच्या या लेखामुळें त्याला एवढें महत्त्व प्राप्त झालें आहे कीं, त्याकरितां दहापंधरा रुपये द्यावयाला आज संग्राहक तयार आहेत. इंग्लंडमध्यें छापलेलें मराठी पुस्तक म्हणून केंब्रिज येथें W. Heffer & Sons Ltd. यांनीं प्रसिद्ध केलेल्या व Mr. Leonard John Sedgwick यांनीं संपादिलेल्या रघुनाथ पंडितकृत नलदमयंतीस्वयंवराकडे अंगुलीनिर्देश करतां येईल. Gramatica Marastta हें पोर्तुगीज भाषेंतून रोमन लिपीमध्यें लिहिलेलें मराठी ग्रामर इ. स. १७७८ सालीं रोममध्यें छापलें व त्याचें पुनर्मुद्रण १८०५ मध्यें लिस्बन येथें झालें. त्याचाही या सदरांत समावेश करावा लागेल. महाराष्ट्राबाहेरील हिंदुस्थानांतील इतर प्रांतांत प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत मघाशीं सांगितलेल्या कॅरेच्या पुस्तकांचा बंगालांतील मराठी पुस्तकें म्हणून अन्तर्भाव करण्यास हरकत नाहीं. बनारस येथें श्रीलक्ष्मीनारायण छापखान्यांत मुद्रित झालेलें सौ. रेबेकाबाई सिमियन यांचें चरित्र त्यांचे पति सिमियन बेंजामिन यानीं लिहिलेलें उपलब्ध आहे. तंजावर हा महत्तर ( Greater ) महाराष्ट्र म्हणूं; परंतु चन्नपटण येथें शिळा छापावर मुद्रित केलेलें ( १८५० ) ' टिपु सुलतान यांचे पदच्युतीविषयीं संक्षेप निरूपण ' हें मद्रासकडील मराठी पुस्तक म्हणून उल्लेखनीय आहे. अशीं महाराष्ट्राबाहेर देशांत किंवा परदेशांत प्रसिद्ध झालेलीं मराठी पुस्तकें एकाद्याला संगृहित करतां येतील.

**चित्रें व छायाचित्रें**—आपल्या इकडे फोटोग्राफीचा प्रवेश १८५०–५५ च्या दरम्यान झाला. या पूर्वीच्या ग्रंथकारांचीं किंवा इतर प्रसिद्ध पुरुषांचीं जर चित्रें असतील तर तीं हातांनीं काढलेलीं आहेत. शिवाजी, रामदास, तुकाराम, नाना फडणवीस वगैरे पुरुषांचीं चित्रें अशा पैकींच होत. १८५० नंतर फोटोग्राफीची कला ज्ञात झाल्यावर आपल्या इकडील बहुतेक ग्रंथकार किंवा इतर प्रसिद्ध

पुरुष यांचीं छायाचित्रें घेण्याची प्रथा सुरू झाली. अशा प्रकारचीं जुनीं चित्रें किंवा नवीं छायाचित्रें यांचा संग्रह करण्यासारखा आहे. त्याचा पुढील ग्रंथकारांना आपले ग्रंथ सजविण्यास फार उपयोग होईल. पुष्कळ वेळीं असा पद्धतशीर संग्रह जवळ असल्यास पुष्कळ कोडीं सोडवितां येतील. उदाहरणार्थः— "आगरकरांची ओळख—" नांवाचें नुकतेंच (१९४५) एक पुस्तक रा. पु. पां. गोखले यांनीं प्रसिद्ध केलें आहे. या पुस्तकांत (पृ. १८४ जवळ पहा) 'लोकहितवादी' म्हणून 'लोकहितवादींचे' चिरंजीव लक्ष्मणराव गोपाळराव ऊर्फ आप्पासाहेब देशमुख यांचा फोटो दिला आहे! ही गफलत आठल्येकृत 'लोकहितवादी'चें चरित्र हें १९२६ सालीं प्रसिद्ध झालेलें पुस्तक (पृ. १३६ जवळ फोटो पहा) पाहिल्यास कळून येईल.

**खोदीव लेख किंवा त्यांचे ठसे व फोटो**—मराठी भाषेचे जेवढे म्हणून शिलालेख किंवा ताम्रपट उपलब्ध झालेले आहेत ते सगळे एकत्र पुस्तक रूपानें पद्धतशीर छापून प्रसिद्ध झालेले नाहींत. अशा प्रकारचे शक्य असल्यास मूळ खोदीव लेख किंवा त्यांचे ठसे व फोटो एकत्र संग्रहित झाले पाहिजेत.

**वैचित्र्ययुक्त किंवा चमत्कारिक पुस्तकें**—(१)**आकार**—मराठी भाषेंतील सर्वांत लहान आकाराचें पुस्तक किंवा सर्वांत मोठ्या आकाराचें पुस्तक. युरोपांत साध्या पोस्टाच्या तिकिटाच्याच नव्हे तर त्याच्या चतुर्थांश आकाराचें पुस्तक मुद्रित झालेलें नमूद आहे. आपल्याकडे तांदळावर चित्र कोरण्याची करामत करणारे लोक आहेत, परंतु अशीं पुस्तकें छापणारे मुद्रक नाहींत. (२) **कागद**—आमच्याकडे कागदाशिवाय इतर वस्तूवरही पुस्तकें छापिलीं जात नाहींत. युरोपांत सुरवातीचीं पुस्तकें वासराच्या किंवा मेंढराच्या कमाविलेल्या कातड्यावर ( vellum ) छापिलीं जात, व मुद्रणकला अस्तित्वांत येण्यापूर्वीं हस्तलेखांकरितां अशा चर्मपत्राचा उपयोग करीत. संस्कृत भाषेचीं भूर्जपत्रावर किंवा ताडपत्रावर लिहिलेलीं हस्तलिखितें पुष्कळ सांपडतात; परंतु मराठीचीं मिळत नाहींत. येथील भारतीय विद्याभुवनांत 'कलानिधि' नांवाचा एक ताडपत्रावर लिहिलेला ग्रंथ संगृहित आहे तो याला केवळ अपवाद होय. इंडिया पेपरवर छापलेलीं पुस्तकें देखील आपल्याकडे दुर्मिळच आहेत. ज्ञानेश्वरी आणि तुकारामाचा व निळोबाचा गाथा हे ग्रंथ चित्रशाळेनें कांहीं वर्षांपूर्वीं

अशा कागदावर छापले होते. कागदावर जाहिराती छापण्याच्या सरकारी निर्बंधामुळें त्याकरितां झाडाच्या पानाचा कागदाच्या जागीं उपयोग केलेला मी पाहिलेला आहे. युरोपांत लहान मुलांकरितां कपड्यावर पुस्तकें छापतात. आपल्याकडे असा प्रयत्न अद्याप झालेला नाहीं. ब्रिटिश म्युझियममध्यें शिशाच्या पानांवर मुद्रित झालेलें एक पुस्तक आहे. शिंपल्यावरील देखील तिकडे मुद्रण उपलब्ध असल्याचें सांगतात. अल्युमिनम धातूच्या पत्र्याचा मुद्रणाच्या कामीं चांगला उपयोग होईल, असें कांहीं शोधकांचें मत होतें; परंतु गेल्या युद्धामुळें या दिशेनें प्रयत्न स्थगित झालेला दिसतो. शंभर वर्षांमागें छापलेलीं कांहीं पुस्तकें मी पाहिलेलीं आहेत. त्यांचा कागद इतका सफेत व टणक आहे कीं, तीं पुस्तकें गेल्या वर्षींच मुद्रित झालीं असावीं असें वाटूं लागतें; परंतु अलिकडे एक दोन वर्षांमागें प्रसिद्ध झालेल्या कांहीं पुस्तकांचा कागद इतका पिवळा किंवा काळा पडलेला असतो कीं, तीं दोनतीन शतकांमागचीं वाटूं लागतात ! आणखी शंभर पाऊणशें वर्षांनीं या कागदाची खात्रीनें धूळ होईल. अशा स्थितींत महत्त्वाच्या पुस्तकांच्या तरी निदान शंभर प्रती टिकाऊ कागदावर निराळ्या छापाव्या, अशी माझी प्रकाशकाना विनंति आहे. अशा पुस्तकांना तिप्पट चौपट किंमत देऊन तीं विकत घेणारीं शंभर कायम गिऱ्हाईकें सहज मिळूं शकतील. कागद जर खराब असेल तर पुस्तक कितीही काळजीनें संभाळिलें तरी तें आपोआप खराब झाल्याखेरीज राहाणार नाहीं. तेव्हां टिकाऊ उंची कागदावर छापलेल्या ग्रंथांना कांहीं खासगी ग्रंथसंग्राहक किंवा सार्वजनिक ग्रंथसंग्रहालयें खात्रीनें आश्रय देतील. (३) **बांधणी**—निरनिराळ्या प्रकारच्या बांधणीचीं पुस्तकें जवळ ठेवण्याची ग्रंथप्रेमी लोकांना हौस असते. मेंढराच्या, वांसराच्या कातड्याप्रमाणेंच हरणाच्या, लांडग्याच्या इतकेंच नव्हे तर माणसाच्या कातड्यानें बांधलेलीं युरोपांत पुस्तकें आहेत. माणसाचें कातडें व वासराचें कातडें याच्यामध्यें विशेष फरक नसतो. त्यामुळें कांहीं लबाड लोक माणसाच्या कातड्याचें म्हणून वांसरांच्या कातड्यानें बांधलेलें पुस्तक पुढें करतात. परंतु या दोन कातड्यांमधील भेद सूक्ष्मदर्शक यंत्राच्या साहाय्यानें जाणतां येतो असें म्हणतात. (४) **गंमती**--पुस्तक छापतां छापतां आरंभीं कांहींतरी गमतीची गफलत किंवा मुद्राराक्षसाचा चाळा ( Freak ) होतो. एकादा मजकूर

उलटाच छापला जातो किंवा सन १९४५ च्या ऐवजीं चुकीनें १८४५ साल पडतें. पुढें ही दुरुस्ती केली जाते; परंतु आधींच्या ज्या कांहीं प्रतींत हा घोटाळा राहून जातो त्या प्रती संग्राहक तन्हेवाईक ( unique ) म्हणून जवळ ठेवण्यास हपापलेले असतात.

अशा प्रकारच्या कितीतरी ग्रंथसंग्राहकांच्या छांदिष्ट दृष्टि आहेत. सर वॉल्टर स्कॉट यानें आपल्या The Antiquary या कादंबरींत एके ठिकाणीं Mr. Oldbuck च्या ग्रंथसंग्रहाचें मजेदार वर्णन केलें आहे तें असें--
" Here were editions esteemed as being the first, and there stood those scarcely less regarded as being the last and best; here was a book valued because it had the author's final improvement and there another which ( strange to tell ! ) was in request because it had them not. One was precious because it was a folio, another because it was a duodecimo, some because they were tall, some because they were short; the merit of this lay in the title page, of that in the arrangement of the letters in the word Finis. There was, it seemed, no peculiar distinction, however trifling or minute, which might not give value to a volume, providing the indispensible quality of scarcity, or rare occurrence, was attached to it. "

## ग्रंथसंग्राहकानें घ्यावयाची काळजी

अशा प्रकारें अनेक दृष्टींनीं ग्रंथ गोळा करतां येतील. परंतु ते गोळा करतांना थोडी शास्त्रीय दृष्टीही ठेवली पाहिजे. महाराष्ट्रांतील जे मी अनेक जुने ग्रंथसंग्रह पाहिले त्यांवरून त्यांपैकीं शेंकडा पाऊणशें प्रती ग्रंथशास्त्रदृष्ट्या अपूर्ण, सदोष व टाकाऊ आहेत, असें मला आढळून आलें. म्हणून होतकरू ग्रंथ-संग्राहकांच्या मार्गदर्शनाकरितां चार शब्द सांगतों :--

ग्रंथसंग्राहकाला ज्या भाषेंतील ग्रंथ गोळा करावयाचे असतील त्या भाषेंतील ग्रंथ व ग्रंथकार यांची चांगली पूर्व माहिती पाहिजे. रा. शंकर गणेश दाते यांनीं तयार केलेली मराठी ग्रंथसूचि या बाबतींत फार उपयोगाची आहे. तिचा प्रत्येकानें अवश्य उपयोग करावा.

ग्रंथ हातांत घेतल्याबरोबर त्याला मुखपृष्ठ (Title page) व इतर क्रमांकपृष्ठें आहेत कीं नाहींत हें दर पृष्ठ पडताळून पाहिलें पाहिजे. या करितां याच पुस्तकांची जर दुसरी एखादी चांगली प्रत उपलब्ध असेल तर तिच्याशीं तें ताडून पाहावें. पुस्तकाचें आरंभींचें कोरें पान, एखादें चित्र किंवा शुद्धिपत्राचा चिटोरादेखील जर त्यांत कमी असेल तर तें पुस्तक अपूर्ण (imperfect) किंवा सव्यंग (defective) मानलें पाहिजे या उणिवा दुसऱ्या पुस्तकांबरोबर आपलें पुस्तक ताडून पाहिल्याशिवाय सहजासहजीं लक्षांत येणार नाहींत. दुसरें पुस्तक उपलब्ध नसल्यास दात्यांच्या मराठी ग्रंथसूचीसारख्या ग्रंथांत जी त्या पुस्तकाची नोंद आहे त्या पुस्तकांतील माहितीशीं हें पुस्तक जुळतें तर पाहावें. या तपासणाला इंग्रजींत Collation म्हणतात. ही तपासणी केल्याबरोबर पुस्तकाच्या कव्हरच्या आंतल्या बाजूला "तपासलें" असें लिहून "पूर्ण" अशी नोंद करावी व तसें नसल्यास त्यांत काय उणिवा आहेत त्या नमूद कराव्या.

पुस्तक शक्यतोवर मूळ बांधणीचें असावें. जुनी बांधणी सैल असेल तर ती काढून टाकून नवी बांधणी करूं नये. जुनीच घट्ट किंवा दुरुस्त करून घ्यावी. आपल्या इकडचे अडाणी बुकबाइंडर लोक पुस्तक नव्यानें बांधतांना तें पुनः कापतात. या कापण्यांत हलगर्जीपणामुळें पुष्कळ वेळां मुळांतील मजकूरही कापला जातो. याला इंग्रजींत a book to bleed (पुस्तकाचा रक्तपात) म्हणतात! असें करणें म्हणजे तें छिन्न-विच्छिन्न (mutilate) करणें आहे. ग्रंथशास्त्रदृष्ट्या हा भयंकर गुन्हा होय. मूळांतच पुस्तकाचें काठ मुळींच न कापणें चांगलें. अशीं Uncut (न कापलेलीं) पुस्तकें आपण पुष्कळ पाहिलीं असतील. त्यांतील दुडलेल्या फार्माची घडी उघडण्याकरितां पत्रपातीनें (Papercutter) फाडावें लागतें. इंग्रजीमध्यें या फाडण्याला "Cut open" असें म्हणतात. हा दरएक पान फाडण्याचा

वाचकांचा त्रास चुकविण्याकरितां पुस्तकांच्या कडांचें "थोडें क्षौरकर्म" ("Slight shave") करण्याचा प्रघात आहे. परंतु तें करण्याकरितां बाइंडरलोकांकडे पुस्तक दिलें असतां ते त्याची हटकून मानच कापतात!

पुस्तक पूर्ण असलें, जुन्या बांधणींत असलें, न कापलेलेंही असलें तरी पण जर त्याची अवस्था ठीक नसेल म्हणजे त्याचीं पानें कसरीनें खाऊन जर त्यांचें जाळें झालें असेल, किंवा त्यांचा कागद खराब झाला असेल तर त्याचे जागीं नवें पुस्तक मिळवून ठेवणें अवश्य आहे. अशा प्रकारें सर्व दृष्टीनीं पुस्तकांचें परीक्षण करून त्याला 'अ' 'ब' व 'क' असे वर्ग द्यावे. जें पुस्तक उत्कृष्ट स्थितींत असेल त्याला 'अ' वर्ग द्यावा. जें पुस्तक चालण्यासारखें असेल परंतु या पेक्षा चागलें मिळालें तर बरें अशा पुस्तकाला 'ब' वर्गांत घालावें व जे पुस्तक अपुरें किंवा सदोष असेल व जें अवश्य काढून त्याच्या बदली नवें मिळविणें त्याला 'क' वर्ग द्यावा. अर्थात् हें वर्गीकरण पुस्तकांच्या स्थितीचें असून विषयाचे नाहीं. जुनीं पुस्तकें ज्याला इंग्रजींत "Mint condition" म्हणतात त्या स्थितींत क्वचितच मिळतात. निर्दोष पुस्तक जोपर्यंत मिळालें नाहीं तोंपर्यंत अपुरें किंवा सदोष पुस्तकच काय, परंतु त्या पुस्तकाचें एखादें फाटकें पानही संग्रहणीय व रक्षणीय मानलें पाहिजे. "खाईन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशीं" असें म्हणून चालणार नाहीं. परंतु आपल्या संग्रहीं असलेलें पुस्तक कोणत्या अवस्थेंत आहे, याची निश्चित जाणीव प्रत्येक संग्राहकाला सतत असली पाहिजे. त्या शिवाय सदोष पुस्तकाच्या जागीं नवें निर्दोष पुस्तक कधींही येणार नाहीं. पुस्तकाच्या मलपृष्ठावर आंतल्या बाजूस त्याचा त्यांतील दोष नमूद करून स्थितिनिष्ठ वर्ग लिहावा. इतकेंच नव्हे तर पुस्तकाच्या यादीमध्येंही तो नमूद असावा. पुष्कळ वेळीं दोन सदोष किंवा अपुरीं 'क' वर्गातील पुस्तकें मिळून एक 'अ' वर्गांतील पूर्ण व निर्व्यंग पुस्तक बनूं शकतें.

मासिकांचीं वर्षअखेर पुस्तकें बांधतांना त्यांचीं कव्हरें काढून टाकण्याचा प्रघात आहे. हा तर शुद्ध निर्बुद्धपणाच होय. मलपृष्ठें नसलेलीं मासिकें 'क' वर्गामध्यें समाविष्ट केलीं पाहिजेत. ग्रंथशास्त्रदृष्टया मलपृष्ठावर पुष्कळदा अत्यंत महत्त्वाची माहिती असते.

केवळ पैसे असले म्हणून ग्रंथसंग्रह होत नाहीं. त्याच्या करतां अत्यंत कष्ट व अनेक खटपटी कराव्या लागतात. ग्रंथ मिळवितांना अनुभवावीं लागणारीं दुःखें व तो मिळाल्यावर होणारा आनंद जातिवंत संग्राहकाशिवाय इतरांना कळणें शक्य नाहीं.

ग्रंथसंग्राहकाची ही मनःस्थिति सर वॉल्टर स्कॉट यांनीं आपल्या The Antiquary या कादंबरींत Mr Oldbuck यांच्या तोंडून सुंदर रीतीनें वर्णन केली आहे--

" See this bundle of ballads, not one of them later than 1700, and some of them a hundred years older. I wheedled an old woman out of these, who loved them better than her psalm-book. Tobacco, sir, snuff, and the ' Complete Syren ' were the equivalent. For that mutilated copy of the ' Complaynt of Scotland ' I sat out the drinking of two dozen bottles of strong ale with the late learned proprietor, who, in gratitude bequeathed it to me by his last will. These little Elzevirs are the memoranda and trophies of many a walk by night and morning through the Cowgate, the Canongate, the Bow, St. Mary's Wynd-wherever, in fine, there were to be found brokers and trokers; those miscellaneous dealers in things rare and curious. How often have I stood haggling on a halfpenny, lest by a too ready acquiescence in the dealer's first price he should be led to suspect the value I set upon the article. How have I trembled lest some passing stranger should crop in between me and the prize and regarded each poor student of divinity that stopped to

turn over the books at the stall, as a rival amateur, or prowling book seller in disguise !

आपल्या तरुणपणांतील सत्यसृष्टींतील एक वृद्ध स्नेही दृष्टीसमोर ठेवून Mr. Jonathan Oldbuck ही व्यक्ति आपण रेखाटली असल्याचें सर वॉल्टरनें आपल्या कादंबरींच्या दुसऱ्या आवृत्तीमध्यें नमूद केलें आहे.

अशाप्रकारें निरनिराळया व्यक्तींनीं जमविलेल्या खासगी ग्रंथसंग्रहांना शेवटीं एकाद्या सार्वजनिक संग्रहालयांत स्थान मिळणें उचित आहे. मग आपल्या आर्थिक परिस्थितीप्रमाणें तो त्या संस्थेला एकाद्यानें देणगी म्हणून दिलेला असो किंवा विकत दिलेला असो. पण कसाही दिला असला तरी इतक्या प्रेमानें, हौसेनें व कष्टानें जमविलेला व मुलाप्रमाणें संगोपन केलेला संग्रह हाता-वेगळा करतांना त्याची शाकुंतलांतील कण्वऋषीप्रमाणें स्थिति झाल्याखेरीज राहाणार नाहीं. तेव्हां आपल्या सार्वजनिक ग्रंथसंग्रहालयांच्या चालकांना माझी अशी आग्रहाची विनंति आहे कीं त्यांनीं आपली अन्तर्गत व्यवस्था अशी चोख ठेवावी कीं जेणेंकरून आपलीं पुस्तकें देणाऱ्या संग्राहकांना त्यांच्या संग्रहाच्या भवितव्याविषयीं काळजी वाटूं नये. एकादें विद्यार्थ्यांचें वसतीगृह पाहाण्यास गेल्यावर तेथील स्वच्छता, शिस्त व टापटीप आणि मुलांचें आरोग्य, अभ्यास व वर्तन उत्तम पाहून ज्याप्रमाणें आपलीं घरचीं मुलें देखील तेथें आणून ठेवावींशीं वाटतात त्याप्रमाणें आपल्या ग्रंथसंग्राहलयांची सुंदर व्यवस्था पाहिजे. नालायक लोकाच्या हातीं सांपडलेल्या एकाद्या भिकार ऑर्फेनेजमधील पोरक्या पोरांप्रमाणें आपल्या ग्रंथालयांतील पुस्तकांची दुर्दशा नसावी. कसर व वाळवी यापेक्षांही उचले लोक हेच ग्रंथांचे खरे शत्रु आहेत. कारण जीवजंतू पुस्तकाचा कांहीं भागच खातात तर उचले सगळेंच पुस्तक गट्ट करतात. यासंबंधी एक चुटका प्रसिद्ध आहे—एका सद्‌गृहस्थाकडे मोठा ग्रंथसंग्रह होता. दुसरा एक गृहस्थ त्याच्याकडे जाऊन वाचण्याकरितां एक पुस्तक मागूं लागला. पहिला गृहस्थ म्हणाला, " हें पहा, पुस्तक एकदा बाहेर दिलें म्हणजे परत येत नाहीं असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. " " तो कसा ? " दुसऱ्या गृहस्थानें पृच्छा केली. " लोकांकडून वाचण्याकरितां आणलेलीं पुस्तकें जर परत केलीं गेलीं असतीं तर येथें एकतरी पुस्तक शिल्लक राहिलें असतें काय ? " पहिला गृहस्थ शांतपणें

म्हणाला ! अशा लोकांना फार जपलें पाहिजे. कांहीं वाचक तर ग्रंथालयांतील पुस्तकाची पानेंच फाडून नेतात. अशा जीवांना फ्लीट आणि पोयशा काय करणार ? या ग्रंथशर्विलकांना युरोपांत Biblioklept अशी संज्ञा आहे.

मी ज्या निरनिराळ्या ग्रंथसंग्रहाच्या दृष्टि सांगितल्या त्या दृष्टीनीं जुनीं पुस्तकें मिळविण्याचा प्रत्येकानें प्रयत्न करावा. वाचनालयांनीं " आमची संस्था संग्रहालय नाहीं " असें म्हणून या बाबतींत कांहींच प्रयत्न न करणें म्हणजे स्वतःची नालायकी सिद्ध करणें आहे, असें मी समजतों. प्रत्येक वाचनालयानें त्या करितां एक स्वतंत्र कपाट ठेवून जुने ग्रंथ जमविण्यास सुरवात करावी. हायस्कुल व कॉलेजें यांतील मराठी अध्यापकांना पुष्कळच कार्य करतां येण्यासारखें आहे. निरनिराळ्या भागांतून त्यांच्याकडे विद्यार्थी येत असतात. त्यांच्या मध्यें ग्रंथसंग्राहकवृत्तीचा जर त्यानीं फैलाव केला तर हे विद्यार्थी सुटीच्या दिवसांत अशीं पुस्तकें जमवितील व तीं जर कॉलेजमध्यें त्यांच्याच नांवानें ठेविलीं तर त्यांच्या कॉलेज मधील वास्तव्याचें तें एक बहुमोल व सुंदर स्मारकच होणार नाहीं काय ? अशा प्रकारची एकादी सूचना आमच्या प्राध्यापक मित्रांसमोर मांडिली तर ते लगेच विचारतात याला परीक्षेमध्यें युनिव्हर्सिटीनें मार्क ठेविलें आहेत कुठें ? ज्याप्रमाणें दर वर्षी गॅदरिंग तुह्मीं निष्काम बुद्धीनें करतां त्याप्रमाणें हा ग्रंथसंग्रहाचाही निष्काम कर्मयोग तुह्मी आचरावा अशी माझी त्यांना विनंति आहे. वर्षाकांठीं आपल्या दुर्मिळ ग्रंथसंग्रहांत जो सर्वांत जास्त व महत्त्वाची भर घालील त्या विद्यार्थ्याला या गॅदरिंगमध्यें रौप्य-पदक किंवा अन्य पारितोषिक द्यावें.

## मुंबईसरकारचा देशी ग्रंथसंग्रह

१८६७ च्या २५ व्या ॲक्टान्वयें मुद्रकानें प्रत्येक पुस्तकाच्या ज्या तीन प्रती सरकारकडे पाठवावयाच्या असतात त्यापैकीं पहिली सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया व दुसरी गव्हर्नर जनरल यांच्याकडे पाठवावी आणि तिसरी स्थानिक सरकारनें तिची नोंद करून एकाद्या ग्रंथालयाला द्यावी किंवा अन्य प्रकारें विल्हेवाट लावावी, असें ठरलें होतें. पुढें ता. २० जुलै १८७१ च्या गॅझेटमध्यें ( पृ. ७८१ ) जाहीर केल्याप्रमाणें ही प्रत डायरेक्टर ऑफ पब्लिक

इन्स्ट्रक्शन यांनीं मुंबई इलाख्यांतील वाङ्मयाच्या वार्षिक आढाव्याकरितां उपयोग करून नंतर मुंबई युनिव्हर्सिटीच्या रजिष्ट्रारकडे पाठवावी, अशी व्यवस्था करण्यांत आली व त्याप्रमाणें ही प्रत युनिव्हर्सिटीकडे जाऊं लागली. पुढें १८९० सालीं हीं जीं पुस्तकें युनिव्हर्सिटीकडे जातात त्यांची काय व्यवस्था आहे अशी सरकारनें युनिव्हर्सिटीकडे विचारणा केली. तिला उत्तरादाखल युनिव्हर्सिटीचे त्यावेळचे रजिष्ट्रार, Mr. D. Macdonald यांच्याकडून जें पत्र गेलें त्यांत म्हटलें आहे कीं, नेटिव पब्लिकेशनच्या रजिष्ट्रारकडून जीं २२,५२४ पुस्तकें आलीं त्यापैकीं ५१६४ वाळवीनें खाल्लीं किंवा गहाळ झालीं आहेत, तरी राहिलेलीं १७३६० पुस्तकें सरकार म्हणेल त्याच्या हवालीं करण्यास सिंडिकेट तयार आहे !!! युनिव्हर्सिटीकडून अशाप्रकारचें विलक्षण उत्तर आल्यावर सरकारनें येथील रॉयल एशियाटिक सोसायटीकडे, " तुह्मीं तरी हीं पुस्तकें ठेवाल का हो ? " अशी पृच्छा केली. तिला ता. ८ अक्टोबर १८९० च्या पत्रानें सोसायटीचे सन्मान्य कार्यवाह श्रीयुत जव्हेरीलाल याज्ञिक यांनीं उत्तर दिलें आहे. त्यांत लिहिलें आहे कीं, दरवर्षी भेटीदाखल येणाऱ्या किंवा विकत घेतलेल्या पुस्तकांमुळें आमचा संग्रह सारखा वाढत असून त्यांनाच आपली जागा अपुरी वाटत आहे. अशा परिस्थितींत या नव्या संग्रहाचा ताबा घेणें कमिटीला शक्य होत नाहीं व त्याची व्यवस्था ठेवण्यास सोसायटीकडे माणसेंही नाहींत. शेवटीं १८९० च्या नवंबर महिन्यांत हीं पुस्तकें सरकारच्या रिकॉर्ड ऑफिसांत सांठवावीं, असा निर्णय घेण्यात आला. असा या मुंबई-सरकारच्या पुस्तकसंग्रहाचा अत्यंत केविलवाणा इतिहास आहे.

हा सगळा इतिहास मुंबई विश्वविद्यालयाचे कर्तबगार ग्रंथपाल डॉ. जोशी यांच्या नजरेस मी आणलेला आहे. ते युनिव्हर्सिटीच्या अधिकाऱ्यांमार्फत खटपट करून मागच्या लोकांनीं नालायकपणें घालविलेला आपला हक्क परत मिळवितील व रिकॉर्ड ऑफिसांत धूळ खात पडलेल्या या मौल्यवान संग्रहाचा उद्धार व संरक्षण करतील, अशी मला आशा आहे.

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची जबाबदारी

Richard Heber ( १७७३–१८८३ ) हा इंग्लंडांतील प्रसिद्ध संग्राहक म्हणे, " No gentleman can be without three

copies of a book, one for show, one for use and one for borrowers." आपल्याकडील खाजगी ग्रंथसंग्राहकांना असें करणें जरी अशक्य असलें तरी पण मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयासारख्या संस्थेनें ग्रंथांची एक जास्त प्रत केवळ संग्रहाकरितांच म्हणजे जी बिलकूल उपयोगाकरितां द्यावयाची नाहीं अशी घेऊन ठेविली पाहिजे. तसेंच अगदीं जुन्या पुस्तकाच्या शक्य तर टाइप प्रती करून वाचावयास द्याव्या. मूळ प्रती लोकांना हाताळतां येत नाहींत आणि त्या ते निष्काळजीपणानें खराब करून टाकतात असा अनुभव आहे. आपल्याकडे पुस्तकांची वर्गवारी किंवा यादी यांची दैनाच आहे. पुस्तकांची यादी जर पद्धतशीर नसेल तर पुस्तक संग्रहीं असून देखील तें वाचकांना मिळणार नाहीं. आपल्याकडील ग्रंथसंग्रहालयांतील कॅटलॉगांतील किंवा सूचींतील मौजा जर कुणी एकत्र केल्या तर तो एक मोठा विनोदी ग्रंथ होईल. येथील एका प्रसिद्ध संग्रहालयांत Ruskin चा Sesame and Lilies हा ग्रंथ Botany and Zoology या वर्गांत घातला होता, अशी आख्यायिका आहे. श्री. **य. रा. दाते** यांच्या महाराष्ट्र वाङ्मयसूचीमध्यें रा. देवस्थळी यांचें सुरतच्या काँग्रेसच्या भांडणावर लिहिलेलें **सुरतकलहशतक** हें काव्य शृंगारामध्यें घातलें गेलें आहे ! तरी कॅटलॉग तयार करतांना पुस्तक आधीं लक्षपूर्वक पाहून नोंद केली पाहिजे. नाहींतर फार घोटाळे होतात. कॅरेच्या छापखान्यांतील मराठी हितोपदेश नांवाचा ग्रंथ आहे. हा एकच ग्रंथ ब्रिटिश म्यूझियम व इंडिया ऑफिस यांच्या कॅटलॉगमध्यें एकीकडे पंचतंत्र व दुसरीकडे हितोपदेश म्हणून नोंदला गेला आहे. विशेष मौज ही कीं या दोनही कॅटलॉगचा कर्ता मि. ब्लुमूहार्ट हा एकच गृहस्थ आहे. या माणसाच्या निष्काळजीपणामुळें आमचे मराठी ग्रंथसूचिकार रा. शंकरराव दाते यांची कॅरेचे पंचतंत्र व हितोपदेश असे दोन ग्रंथ असावेत अशी चुकीची समजूत झाली असें त्यांच्या ग्रंथांतील आद्यमुद्रितांची यादी आहे तिच्यावरून दिसून येईल. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय हें ब्रिटिश म्युझियम-सारखें बृहन्महाराष्ट्राचें आदर्श मराठी ग्रंथसंग्रहालय होण्यासारखें आहे. परंतु केवळ लोकाश्रयावर त्याची सुधारणा करतां येणें शक्य नाहीं. त्याला राजाश्रय पाहिजे. त्याकरितां महाराष्ट्रांतील जेवढे म्हणून महाराष्ट्रीय संस्थानिक आहेत त्यांच्याकडून वार्षिक मदत मिळविली पाहिजे. युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयाची

प्रवेशपत्रिका दाखविल्यास विद्यार्थ्यांना मोफत प्रवेश देऊन युनिव्हर्सिटीकडून वार्षिक ग्रँट मिळविणें शक्य आहे. सुदैवानें मुंबई म्युनिसिपालिटी वार्षिक मदत देते. तिच्यामध्यें वाढ झाली पाहिजे. कॉंग्रेससरकार पुनः जेव्हां अधिकारपदारूढ होईल त्यावेळीं आपणास मदतीची आशा करण्यास जागा आहे. आपणास कार्यक्षम अशा ग्रंथपालाची आवश्यकता आहे. मात्र हा ग्रंथपाल केवळ त्याचा डिप्लोमाच पाहून निवडतां कामा नये. खऱ्या अभ्यासाला सुरवात पदवी किंवा डिप्लोमा मिळाल्यावर होते. पण हिंदुस्थानांमध्यें बहुधा येथेंच अभ्यासाची परिसमाप्ति होते. यापेक्षां अशा डिप्लोमाचा किंवा पदव्यांचा विटाळ ज्यांना झाला नाहीं असे रा. दात्यांसारखे जर एकादे स्वयंभू ग्रंथपाल आह्मांला लाभले तर ते उत्कृष्ट ग्रंथालय निर्माण करतील. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें आपलें कार्यक्षेत्र मुंबई बेटापुरतें मर्यादित न ठेवतां सबंध बृहन्महाराष्ट्र करावें. कार्याबरोबर त्याच्या नांवाची व्याप्ति जर वाढवावयाची झाली तर येत्या सुवर्णमहोत्सवाच्या प्रसंगीं " बृहन्महाराष्ट्र ग्रंथसंग्रहालय " असें व्यापक नांव त्यानें धारण करावयास हरकत नाहीं. बाकी मुंबई विश्वविद्यालयाप्रमाणें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयालाही सध्यांच्याच नांवाखालीं व्यापक कार्य करावयास हरकत असूं नये. मात्र सबंध महाराष्ट्राला ब्रिटिश म्युझियमसारखें एक चांगलें आदर्श ग्रंथसंग्रहालय पाहिजेच पाहिजे. असो.

ग्रंथसंग्रह हा कांहीं निरुद्योगी माणसांचा निष्फल नाद नाहीं. लोकहितवादी व कार्लाइल यांच्या उद्गारांवरून तें एक थोर राष्ट्रकार्य आहे, हें आपणास दिसून येईल. केंब्रिज युनिव्हर्सिटीचे ग्रंथशास्त्राचें प्राध्यापक Mr. Seymour de Ricci हे ग्रंथसंग्रहाच्या चळवळीच्या वैयक्तिक प्रयत्नासंबंधानें म्हणतात, " Public institutions have done their best, but, in nearly every instance, private initiative has shown them the way. Personal vanity, the mainspring of book collecting, has continually given way to local and national pride. *In England, to be a collector has nearly always meant to be a patriot.* " अशा प्रकारचे पुष्कळ देशभक्त आपल्या हिंदुस्थानांत निर्माण व्हावे असें परमेश्वराला प्रार्थून आजचें प्रदर्शन उघडल्याचें मी जाहीर करतों.

# सुस्वागतम्

सुस्वागतम् ! स्वागतसमितीचा अध्यक्ष या नात्याने माझें पहिलें कर्तव्य म्हणजे समितीच्या वतीने आपणा सर्वांचें स्वागत करणें हें होय; आणि तें मी अत्यंत मनःपूर्वक आणि आनंदाने करतों. आमच्या या आमंत्रणाचा प्रेमाने व अगत्याने स्वीकार करून आपण या परिषदेसाठी हजर झालांत याबद्दल स्वागताबरोबरच आपले आभार मानणेंही उचित असें मला वाटतें.

त्याचप्रमाणे या परिषदेचे अध्यक्ष श्रीयुत बाळासाहेब खेर यांनी आपले दुसरे विविध व्यवसाय बाजूला ठेऊन आमच्या निमंत्रणाचा स्वीकार करून या परिषदेच्या कार्याची धुरा वाहण्याचें आनंदानें कबूल केलें याबद्दल आपणां सर्वांच्या वतीने मी त्यांचे आभार मानतों. परिषदेच्या कार्यक्रमांत अध्यक्षपरिचय असें एक कलम आहेच आणि जे कोणी कार्यवाह या परिषदेला अध्यक्षांची ओळख करून देणार असतील ते आपल्याला त्यांच्याबद्दल विशेष माहिती सांगतीलच. पण आपल्याला जर कदाचित् माहित नसेल तर मी एवढेंच सांगून ठेवतों कीं श्रीयुत खेर हे काँग्रेस राजवटीत मुंबई प्रांताचे मुख्य प्रधान व शिक्षणमंत्री होते. आणि त्यांनी ग्रंथालयांची घटना या विषयावर जे अनेक प्रश्न आहेत त्याबद्दल पुष्कळ विचार केलेला आहे, इतकेंच नव्हे तर या विचारांना ते मूर्त स्वरूपही देणार होते. पण मध्येंच माशी शिंकली. म्हणजे महायुद्ध सुरू

---

मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाच्या वेळीं स्वागताध्यक्ष डॉ. पु. म. जोशी यांनीं केलेलें भाषण

झालें व कॉंग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामा दिला. त्यामुळे त्यांनी जें कार्य करण्याचें योजिलें होतें तें अर्धवटच राहिलें. असो. याबद्दल उल्लेख मी पुन्हां माझ्या भाषणांत करणार आहे इतकी धोक्याची सूचना देऊन मी दुसऱ्या मुद्यांकडे वळतों.

मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेचें हें दुसरें अधिवेशन. म्हणजे आपल्या कार्याला नुकतीच सुरुवात झाली आहे. पहिलें अधिवेशन गुदस्ता ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळीं भरविलें गेलें हें ठीकच. कारण मुंबई व आसपासच्या भागांतील ग्रंथालयांत ती सर्वांत ज्येष्ठ अशी संस्था आहे; आणि तिच्या सुवर्णमहोत्सवाच्या सुप्रसंगी ग्रंथालयीन विषयांच्या विचाराला चालना मिळाली हें त्या समारंभास उचित असेंच झालें. यंदा मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या वतीने हें काम होत आहे, तें नीट रीतीने पार पाडणें हें या परिषदेच्या स्वाधीन आहे.

मला वाटतें कीं स्वागतसमितीच्या अध्यक्षपदासाठी माझी जी निवडणूक झाली ती थोडी गुळाचा गणपति व गुळाचा नैवद्य अशासारखीच आहे आणि म्हणूनच मी सुद्धां आपल्याला आज ग्रंथालयीन संघटनेविषयींच दोन शब्द सांगण्याचा निश्चय केलेला आहे.

सहासात वर्षांपूर्वी अहमदनगरच्या मराठी साहित्यपरिषदेच्या बरोबरच एक वाचनालयपरिषद भरली होती; आणि ती आजच्या ह्या परिषदेपेक्षां जास्त व्यापक स्वरूपाची होती. परंतु त्यानंतर पुन्हां अशी महाराष्ट्रवाचनालय-परिषद् भरल्याचें मला कांहीं आठवत नाहीं. याला अनेक कारणें असूं शकतील. एक-आणि माझ्या मतें मुख्य कारण म्हणजे अशा परिषदेंत अर्थातच ग्रंथपाल प्रामुख्यानें वावरणार. पण आपल्या देशांत असे स्वतंत्र ग्रंथपालच फार कमी. ग्रंथपाल म्हणजे बहुशः कारकुनी पेशाचाच माणूस अशी समजूत आणि प्रथा दिसून येते. त्यामुळे साहित्यिकांनी आणि ग्रंथसंग्रहालयांच्या उत्साही कार्यवाहांनी मनावर घेतल्याशिवाय आजच्यासारखे मेळावे होणें कठीण.

आनंदाची गोष्ट अशी कीं ठाण्यास भरलेली परिषद् व आज येथें भरलेली परिषद् या दोन्हीही, ग्रंथालयांच्या कामांत आपुलकीनें भाग घेणाऱ्या सज्जनांच्या परिश्रमामुळेंच भरल्या आहेत. आणि महाराष्ट्रांत ग्रंथालयीन जें

कांही कार्य होणार आहे तेंही पण त्यांच्याकडूनच होईल अशी माझी खात्री आहे. याबद्दल पुरावा म्हणजे येथें जमलेल्या प्रतिनिधींमध्यें धंदेवाईक ग्रंथपाल ( म्हणजे माझे मित्र रा. कापडी, रा. पारखी किंवा माझ्यासारखे ) फारच थोड्या प्रमाणांत आढळून येतील. बहुतांशी ग्रंथालयांचें काम विनावेतन करणारे कार्यवाहच येथें जमा झालेले आहेत असा तर्क मी जर केला तर तो कांहीं वावगा होणार नाहीं.

असे आपुलकीने काम करणारे लोक आपल्यामध्यें आहेत म्हणूनच महाराष्ट्रांतील कित्येक संस्था तग धरून आहेत; नाहीं तर त्यांची स्थिति काय झाली असती याबद्दल विचारच न करणें बरें. आणि अशा या काम करणाऱ्या मंडळींबद्दल प्रगट रीतीनें दोन गौरवपर शब्द बोलण्याची आज संधी मिळाली याबद्दल मला फार आनंद होत आहे. जेव्हां जेव्हां मी एकाद्या ग्रंथसंग्रहालयाबद्दल माहिती वाचीत असतो किंवा मिळवीत असतों तेव्हां तेव्हां मला या संस्थांच्या कार्यकारी मंडळांच्या सभासदांबद्दल व चिटणीसांबद्दल कौतुकच वाटतें. कदाचित् लोक नावें ठेवताहेत, ‘ कशाला हे लष्करच्या भाकऱ्या भाजतात ’ ‘ अहो नवी नवी पुस्तकं वाचायला मिळावीं म्हणून हा सगळा खटाटोप ’. अशा तऱ्हेची अनेकांची अनेक कुत्सित बोलणी ऐकून घ्यावी लागतात. कोणी आपल्या खाजगी वेळाचा व्यय करून व कांहीं तर स्वत:च्या पदराला थोडाफार खार लावून ग्रंथालयांच्या व्यवस्थेचें काम पहात असतात. हे सर्व आपापल्या परीनें समाजसेवाच करीत असतात. असे जे ग्रंथालयांचे अनेक सेवक ( येथें हजर असलेले व नसलेले ) यांना शतशः कृतज्ञ धन्यवाद.

अशा तऱ्हेनें आपल्या संस्थांना मोठ्या हुरूपाने काम करणारी माणसें मिळतात पण बहुतेक संस्थांना पैशाची नड मात्र फार तीव्रतेने भासते. वर्गणीदारांकडून जी कांहीं थोडीफार वर्गणी येते तिच्यावर ग्रंथालयाचा संसार चालवावयाचा म्हटलें तर कांहींच काम होणें शक्य नाहीं. या करतां ग्रंथालयाला सरकारच्या व नगरपालिकांच्या मदतीची अपेक्षा करावी लागते. कांहीं वेळेला अशी मदत मिळते; पुष्कळदां मिळतही नाहीं. कधीं कोणी मोठी माणसें ग्रंथालय पहावयास येतात व थोडीं फार द्रव्याची मदत देतात. ( कांहीं फक्त चांगला शेराच देऊन पानसुपारी घेऊन जातात. ) येथें माझ्या पाहण्यांत ग्रंथालयांनी

पैसे मिळविण्यासाठी जे कांहीं विविध उपाय केले आहेत त्यांचा थोडा उल्लेख करावासा वाटतो. एखाद्या ग्रंथालयाच्या मदतीसाठी बोलपटाचे किंवा नाटकांचे कार्यक्रम ठेवले जातात आणि त्या कार्यक्रमाचें जें कांहीं उत्पन्न खर्च वजा जातां राहतें तें ग्रंथालयास देण्यांत येतें. माझ्या माहितीचं एक ग्रंथालय आपल्या या मुंबई शहरांत आहे; लढाईच्या पूर्वीं त्या ग्रंथालयाचें कार्यकारी मंडळ सहकारी तत्त्वावर एक कापडाचें दुकान चालवीत असत व त्यापासून झालेला फायदा ग्रंथालयाच्या कामाला वापरीत असत हल्लीं परिस्थिती बदलली असल्यामुळें ते दुसऱ्या कोणत्या उपायानें पैसे उभारतात हें कांहीं मला माहीत नाहीं पण त्यांच्या संस्थेबद्दल त्यांचें प्रेम आणि तिच्याकरतां झटण्याचा त्यांचा दुर्दम्य उत्साह याबद्दल मला फारच कौतुक वाटतं.

पण या मार्गांनी कांहीं ग्रंथालयांना स्थैर्य व बळकटी येत नाहीं. त्याकरतां सरकारचा नगरपालिकेचा व इतर स्थानिक संस्थांचा पाठिंबा हा पाहिजेच. असें झालें म्हणजे वाचनालय संस्था ज्या हल्ली वर्गणीदारांच्या म्हणून गणल्या जातात त्या सर्व जनतेच्या होतील. आणि खेर साहेबांनी पंतप्रधान असतांना जी कामगिरी केली ती याच दिशेनें. प्रधानकीचें त्यागपत्र देण्याच्या सुमारासच "ग्रंथालयवर्धनसमिती" या नांवाची एक समिती नेमण्याबद्दल त्यांनी हुकुम दिले होते. त्यांच्या अधिकारत्यागानंतर जे सल्लागारांचं सरकार बनलं त्यांनी ही योजना पाहून "ग्रंथालयवर्धनसमितीच्या" कामाला चालना दिली. या समितीचा अहवाल प्रसिद्ध झालेला आहे तो आपणा कित्येकांच्या पाहण्यांत आलेला असेलच. त्या अहवालांत आपल्या मुंबई प्रांतांत ग्रंथालयीन घटनेची सर्वांगीण वाढ कशी करतां येईल याबद्दल सविस्तर उहापोह केलेला आहे. आणि शिवाय ग्रंथालयांचें लोण अगदीं खेडेगांवांपर्यंत कसें पोचवितां येईल याबद्दलही आराखडा मांडला आहे.

येथें एक गोष्ट आपल्या निदर्शनास आणली पाहिजे. सरकारने जरी ग्रंथालयांच्या जोपासनेचें कार्य आपल्या हातांत घेतलें तरी धनिक नागरिकांनी या सत्कार्याला मुक्त हस्ते मदत केलीच पाहिजे. अँड्र्यू कार्नेजी हें नांव आपणास ठाऊक असेलच. त्यांनी ग्रंथालयांच्या मदतीस म्हणून खास एक मोठा द्रव्यनिधी ठेवलेला आहे व इंग्लंड देशांत जेव्हां जेव्हां ग्रंथालयाची नवीन इमारत

बांधतात किंवा एकाद्या मोठ्या शहरांत ग्रंथालयाच्या शाखा उघडतात तेव्हां तेव्हां या निधींतून या नवीन संस्थांना अत्यंत सढळ हाताने मदत करण्यांत येते. जर ही कार्नेजी निधीची मदत नसती तर इंग्लंडमधील ग्रंथालयें कितपत जोमदार झालीं असतीं ? त्यांनाही कदाचित् कष्टांतच दिवस काढावे लागले असते; किंवा त्या देशांतल्या ग्रंथालयांची संख्या आहे त्यापेक्षां बरीच कमी असती. एका शहरांत मध्यवर्ती ग्रंथालयाच्या उपशाखा जेव्हां उघडण्याचा बूट निघाला तेव्हां त्या सर्व उपशाखांच्या इमारतीला कार्नेजी निधीतूनच पैसा मिळाला. नगराधिकारी ग्रंथालयांच्या खर्चाकरता कर वसूल करतातच पण इमारतीच्या खर्चाची त्यांच्याकडे सोय नव्हती. जी गोष्ट इंग्लंड देशाची तीच अमेरिकेची. ग्रंथालयीन बाबतींत अगदीं अग्रेसर असा जो हा अमेरिका देश, त्याच्यांत सुद्धां कार्नेजी, रॉकफेलर किंवा अशाच दुसऱ्या द्रव्यनिधींच्या मदती· मुळेंच कित्येक ग्रंथालयें निघालीं आहेत.

आपल्या देशांतील धनिकांनी यापासून बराच बोध घेण्यासारखा आहे. पण तो बोध ते घेतील का ? का बोकेसंन्याशांच्याकरतां अन्नछत्रे आणि आधींच समृद्ध असलेल्या देवालयांना मदत किंवा मुंग्यांना साखर घालण्याकरतां म्हणून विश्वस्तनिधी यांतच ते आपल्या पैशांचा व्यय करणार ?

बडोदा सरकारनें हा पैशाचा प्रश्न मोठ्या सुंदर रीतीनें सोडविलेला आहे. ज्या गांवांत नवीन वाचनालय निघणार असेल त्या गांवकऱ्यांनीं एकतृतीयांश, स्थानिक सरकारनें एकतृतीयांश व मध्यवर्ती म्हणजे बडोदा सरकारनं एकतृतीयांश खर्च द्यावा अशी ही योजना आहे. आणि तिची अंमलबजावणी समाधानकारक रीतीने होत आहे. आपल्या देशांत जसजसं शिक्षण वाढत जाईल तसतशी लोकांची वाचण्याची जिज्ञासाही वाढतच जाणार आणि आपणही अशीच कांहीं तरी व्यवस्था केली पाहिजे, म्हणजे स्थानिक धनिकांनी ग्रंथालयांच्याकरितां सढळ हाताने मदत केली पाहिजे हें ओघानेच आलें.

शिक्षण ज्या प्रमाणांत वाढेल त्या प्रमाणांत किंवा त्याहूनहि जास्ती प्रमाणांत ग्रंथालयांची वाढ होणे जरूर आहे. हल्ली साक्षरताप्रसाराची मोहीम जी सुरू आहे, आणि आपलं सरकार परत आल्यावर जी पुन्हां अनेकपट जोराने चालणार आहे, तिचें कार्य जर नीट रीतीने पुढे चालवावयाचें असेल

तर तिला ग्रंथालयांची जोड मिळालीच पाहिजे. हिंदुस्थानसरकारचे शिक्षण-सल्लागार सार्जेंटसाहेबबहादूर यांनी जी हिंदी शिक्षणाची एक प्रचंड योजना आपल्यापुढे मांडली आहे तिची नीट रीतीने सांगता व्हावयाची असेल तर देशांत ग्रंथालयांची एक सांखळीच तयार करावी लागेल. आणि याकरतां मी मागें उल्लेख केलेल्या "ग्रंथालयवर्धन समिती"च्या अहवालाचा फार उपयोग होणार आहे. आपल्या देशांत ज्या पुनर्घटनेच्या योजना आहेत त्यांत ग्रंथालयांना त्यांचे योग्य स्थान मिळावें अशी खटपट आपण केली पाहिजे. येथें एका सूचनेचा उल्लेख करण्याचा मोह आवरत नाहीं. जर यदाकदाचित् हिंदुस्थान व इंग्लंड या दोन देशांत राजकीय तह झाला तर त्या तहाच्या कलमांपैकीं माझ्या मतें एक अवश्य कलम म्हणजे भारतमंत्र्यांच्या कचेरीला जोडून जें जगविख्यात "हिंदुस्तान कचेरी ग्रंथालय" आहे तें हिंदुस्तानाला मिळविणें हें होय. आणि प्रत्येक वाचनालय परिषदेने याबाबत ठराव पसार करून या प्रश्नाची तीव्रता व जरुरी लोकांच्या व सरकारच्या निदर्शनास वेळोवेळीं आणून देण्यास बिलकुल चुकूं नये.

असो. आतां ग्रंथालयांच्या संघटनेबद्दल आजपर्यंत काय कार्य झालें आहे याचा आढावा घेऊं. "हिंदुस्थान ग्रंथालय संघ" या नांवाची एक अखिल भारतीय संस्था आहे हें आपल्यापैकीं बहुतेकांना माहीत असेलच. ग्रंथालयीन सर्व विषयांवर हा संघ नेहमी विचार करतो व त्याचीं जीं द्विवार्षिक संमेलनें होतात त्यांत ग्रंथालयशास्त्रांतील अनेक शाखावर व अनेक प्रश्नांवर निरनिराळे प्रबंध वाचले जातात. शिवाय हा संघ इंग्रजीमध्यें एक त्रैमासिकही चालवीत आहे. आपण जो नवीन मराठी ग्रंथालय संघ काढणार आहांत त्याची या भारतीय संघाचा एक घटक म्हणून नोंद करून घ्यावी अशी सूचना मी जाता जाता करतों

प्रांतीय ग्रंथालय संघटनेच्या बाबतींत पंजाब, बंगाल व मद्रास हे मुंबई-प्रांताच्यापुढें आहेत. ह्या तिन्ही प्रांतांत संघ असून पंजाबसंघाचें एक मुखपत्रही दर तिमाहीस प्रसिद्ध होतें. त्याचप्रमाणे मद्रासंघही वार्षिक किंवा जशी सवड पडेल त्याप्रमाणें ग्रंथालयीन निबंधांचें एकादें पुस्तक प्रसिद्ध करतो. ह्या संघाची सर्वांत मोठी कामगिरी म्हणजे त्याने आजपर्यंत ग्रंथालयशास्त्रांतील निर-

निराळ्या प्रश्नांचा उहापोह करणारे दहाबारा उत्कृष्ट ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत व त्यांची बोलवा सर्व ग्रंथालयीन जगभर झाली आहे. हें सर्व प्रचंड काम आपल्या धंद्याचे नेते व प्राणच असे रावसाहेब रंगनाथन् यांच्या एकट्याच्याच स्फूर्तीचा परिणाम आहे. कै. सयाजीराव गायकवाड व रा. रंगनाथन् या दोघांनीच हिंदुस्थानला जगाच्या ग्रंथालयीन नकाशावर मोठें मानाचें स्थान मिळवून दिलें आहे हें आपण विसरून चालणार नाहीं. याशिवाय मद्रास संघाची दुसरी मोठी कामगिरी म्हणजे त्यानें ग्रंथालय-वाचनालयांची चळवळ सर्व मद्रास प्रांतभर मोठ्या जोराने चालविली होती. हल्लीं ती थोडी मंदावलेली असली तरी फिरून पूर्ववत् काम करूं लागेल अशी आपण आशा करूं या.

इतर प्रांतांतूनही ग्रंथालयसंघटनेचा थोडा फार विचार केला जातो. आपल्याकडे बडोदा राज्यांत असा संघ आहे व त्याच्या वतीने "पुस्तकालय" नांवाचें एक गुजराती मासिकही प्रसिद्ध केलें जातें. मुंबई प्रांताचें वैशिष्ट्य म्हणजे ज्या ग्रंथालयवर्धनसमितीचा मी एकदोनदां उल्लेख केला ती होय. तिच्या अहवालाचा जेव्हां आपलें नवें जनतेचें सरकार सांगोपांग विचार करील तेव्हां आपल्या प्रांतांत ग्रंथालयीन चळवळींना नवीन तऱ्हेचीच स्फूर्ति मिळणार आहे.

पण हा जो उषःकाल येऊं पहात आहे त्याच्या करितां आपणही आपल्या बाजूने तयार असलें पाहिजे. मराठी ग्रंथालय संघाची स्थापना हा त्या तयारीचाच एक भाग. आणि लवकरच मुंबई प्रांतिक ग्रंथालय संघाची स्थापना पण आपण करूं या. या संघाची प्राणप्रतिष्ठा तीन वर्षांपूर्वीच झालेली होती. पण संघाचें कार्य अजून सुरू झालेलें नाहीं. मात्र "मुंबई ग्रंथालय संघ" अशी एक नवीन संस्था आपल्या या शहरांत गतवर्षी स्थापन झाली आणि तिला पुष्कळ कार्य करण्याचा हुरूप आहे. तिच्याच चालकवर्गापैकीं एक दोघांनी मिळून "कैखुस्रू तारापोरवाला" नांवाची ग्रंथालयीन पुस्तकांची माला सुरू केली आहे. या मालेंत एक लहानसें पुस्तक "मराठी वाङ्मयाचें वर्गीकरण" रावसाहेब रंगनाथन् यांनी लिहिलें आहे; त्याचा मराठी तर्जुमा या नव्या मराठी ग्रंथालय संघाच्या वतीने प्रसिद्ध व्हावा अशी शिफारस मी करितों. हें भाषांतर ग्रंथालय-

शास्त्रांतील दर्दी अशा एका ग्रंथपालांनीं तयार केलें आहे व पुस्तक प्रसिद्धी करितां होणाऱ्या खर्चाची थोडी फार हमी मी घेतों.

संघाने दुसरें करण्यासारखें कार्य म्हणजे महाराष्ट्रांतील ग्रंथालयांची सूची हें होय. परंतु ही सूची नुसती यादीवजा होऊन उपयोगी नाहीं; तर तींत ग्रंथालयाचा थोडा इतिहास, वाचक संख्या, पुस्तकें व वर्तमानपत्रें इत्यादिकांवर खर्च, ही माहिती, त्याच प्रमाणें ग्रंथपाल कसा आहे, इमारत कशी आहे, ग्रंथालयाची एकंदर सांपत्तिक स्थिति कशी आहे इत्यादि माहिती पण असावी अशी सर्वांगीण माहिती जर आपण जमवाल तर ती इंग्रजीत प्रसिद्ध करण्याची खटपट मी करीन. माहिती मिळविण्याकरितां आपले मित्र श्रीयुत द. वा. जोशी यांनी एक प्रश्नपत्रिका तयार केली आहे ती अवश्य विचारांत घ्यावी.

ग्रंथालयीन प्रश्नांचा शास्त्रोक्त रीतीने विचार करून त्या विषयावर मराठींत पुस्तकें प्रसिद्ध करावी अशीही एक नम्र सूचना या अभिरूपभूयिष्ठा परिषदेपुढें मांडतों. कै. रानडे व श्रीयुत पारखी यांनी या दिशेनें प्रयत्न केले आहेत आणि मराठींत पारखी यांचें ' ग्रंथालयशास्त्राचा ओनामा " हें एकच पुस्तक ग्रंथालयांच्या तंत्राबद्दल आहे. रा. दात्यांच्या ग्रंथाबद्दल कालच्या वक्त्यांनी उल्लेख केलाच आहे. अगदीं एकलव्याप्रमाणें दात्यांनी त्या पुस्तकावर तपश्चर्या केलेली आहे.

आपल्या ग्रंथालयांचा भविष्यकाळ उज्वल आहे. आस्थेने व आपुलकीने काम करणारे लोक आपल्यांत आहेत. ग्रंथालयीन प्रश्नांचा विचार करून त्यावर लिहिणारेही विद्वान् आहेत. जसजशी साक्षरता वाढत जाईल तसतशी ग्रंथालय-संघटनेकरितां कार्य करणारांची संख्या जास्त होईल. आणि जर सरकारने व धनिक नागरिकांनी मनावर घेतलें तर या सर्वांच्या उत्साहाचें साफल्य होईल.

---

# शिक्षणाचें सदावर्त

अध्यात्मविद्येचें माहेरघर, अनेक विद्या, कला व शास्त्रे यांचे उत्पत्तिस्थान अशा आपल्या या प्राचीनतम भारतवर्षात वास्तविक पुराणवस्तुसंग्रहालयें व ग्रंथालयें सर्वांत अधिक व सर्वांत जुनीं असावयास पाहिजे. परंतु दुर्दैवाने वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे. मुद्रणकला व कागद तयार करण्याचें शास्त्र यांचा शोध प्रथम ज्याने लावला त्या चीनदेशांत पहिलें ग्रंथालय इसवी सनापूर्वी ३००० वर्षें स्थापन झालें, हें स्वाभाविकच होय. पण हिंदुस्थानांतही बुद्धकालापासून अनेक ग्रंथसंग्रहालयें तक्षशिला, नालंदा आदि विद्यापीठांत व अन्यत्र स्थापित झालेलीं होतीं. चिनी प्रवाशांनी हिंदुस्थानांतून ग्रंथ आपणाबरोबर नेले, अशी माहिती आपणास उपलब्ध असूनही आजची आपली या बाबतीतील परिस्थिती आपलें अज्ञान, दारिद्र्य व पारतंत्र्य यांना साजेल अशीच आहे. काल रोजी पुराणग्रंथ, हस्तलिखितें व दोलामुद्रितांच्या प्रदर्शनाचें उद्घाटन करतेवेळी श्री. प्रियोळकर यांनी जें सुंदर भाषण केलें त्यांत त्यांनी आपल्या प्रांतांत प्रथम मुद्रणालयें केव्हां स्थापित झाली व कोणते ग्रंथ छापले त्याचा इतिहास आपणांस सांगितला आहे. त्यांच्या भाषणाबद्दल मी त्यांचें अभिनंदन करतों. श्री. रा. गो. कानडे यांच्या "प्राचीन व अर्वाचीन ग्रंथालयें" या ग्रंथातील माहितीप्रमाणे १९३८ सालीं केवळ १००० अगर थोडीं अधिक अशीं नांवाचीं ग्रंथालयें या प्रचंड ३८ कोट लोकसंख्येच्या देशांत होतीं. त्यांचीही काय अवस्था होती तें सांगण्याची जरूर नाहीं. तर त्याच्या निम्याहून कमी लोकसंख्येच्या अमेरिकेंत तीन हजार 'प्रमुख' ग्रंथालयांची नोंद होती व

---

मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा वाचनालय परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाच्या वेळीं अध्यक्ष श्री. बा. गं. खेर यांनी केलेलें भाषण.

पुस्तकांच्या, नियतकालिकांच्या व वर्तमानपत्रांच्या संख्येची तुलना केली तर आपणास लाजेने मानच खाली घालावी लागेल! जेथें अक्षरज्ञानच शेंकडा बाराहून अधिक लोकांस नाही तेथें दुसरी काय परिस्थिती असणार? या शोचनीय परिस्थितीचें मुख्य कारण आपलें अनेक शतकांचें राजकीय पारतंत्र्य व दुय्यम कारण आपल्या समाजांतील सुशिक्षितांची बहुसंख्य अज्ञानी जनतेबद्दलची अनास्था हीं होत. हीं दोन्ही कारणें आतां नष्ट होऊं घातलीं आहेत. याचें प्रमाण आपल्या देशांतील ग्रंथालय चळवळीची सुरवात व वाढ.

"ग्रंथालयशास्त्राचा ओनामा" या छोट्याशा पुस्तकांत श्री. पारखी यांनी 'ज्या ठिकाणीं निवडक ग्रंथांचा व ज्ञानप्राप्तीकरितां लागणाऱ्या इतर साधनसामग्रीचा संग्रह असतो, ग्रंथांची मांडणी तर्कसंमत असते व ग्रंथांची उपयुक्तता वाढविण्याच्या दृष्टीनें जेथें प्रयत्न केला जातो अशा स्थानाला "ग्रंथालय" ही संज्ञा देण्यांत येते,' अशी ग्रंथालयाची व्याख्या केली आहे. नमुनेदार ग्रंथालय होण्यासाठीं रम्य व सोयीची जागा, गुणी व प्रेमी ग्रंथालयाधिकारी, उत्तम निवड केलेल्या ग्रंथांचा संग्रह, ग्रंथांची शास्त्रशुद्ध मांडणी व ग्रंथ विकत घेण्यासाठीं व ग्रंथालयाची सुव्यवस्था ठेवण्यासाठी जरूर तितका पैसा एवढीं पांच अंगें अवश्य आहेत. आपला उद्देश सांगितल्याबरोबर त्या त्या विषयांची माहिती असलेले ग्रंथपाल, त्या विषयावरचीं अगदीं अद्यावत उत्कृष्ट पुस्तकें व मासिकें आपणास ताबडतोब पुरवून चर्चा करून उद्देश सिद्ध होण्यास मदत करतात अशी व्यवस्था पाश्चात्य ग्रंथालयांतून आहे हें श्री. पारखी यांचें वर्णन ग्रंथालयाच्या कार्याची उत्तम कल्पना आणून देतें.

ग्रंथालयचळवळीचें कार्य त्रिविध आहे. जनतेचे (१) निरक्षर (२) साक्षर-म्हणजे अक्षर ओळख झालेले पण शिक्षण न मिळालेले व (३) सुशिक्षित असे तीन वर्ग आपण केले तर त्या तिन्ही वर्गांच्या बाबतींत ग्रंथालयचळवळीचें भिन्नभिन्न कर्तव्य आहे. निरक्षर लोकांना सुशिक्षित करतां आलें नाहीं तरी सर्व अगत्याच्या—महत्त्वाच्या प्रश्नांची त्यांना माहिती मिळेल असें केलें पाहिजे. आधुनिक, सार्वजनिक व वैयक्तिक जीवनांतील जरूर त्या सर्व गोष्टी व्यक्ति व समाजाचे घटक या दोन्ही नात्यांनी त्यांना अवगत केल्या पाहिजेत. आरोग्य, आहार, ग्रामीण स्वच्छता, ग्रामीण जीवनांत नित्य संबंध

येणाऱ्या सरकारी बिनसरकारी व्यक्तींचे हक्क व कर्तव्यें, सामाजिक कर्तव्यांची जाणीव इत्यादि आवश्यक बाबींच्या अज्ञानामुळे निरक्षर जनतेची होणारी दुरवस्था नाहींशी करण्यास मदत करणें हें ग्रंथालयचळवळीचें ( Library Movement ) निरक्षर जनतेबद्दलचें कर्तव्य होय.

ज्यांना फक्त अक्षर ओळख आहे परंतु ती कशी टिकवावी–आपल्या शिक्षणाला योग्य सुरवात करून ज्ञानांत भर कशी घालावी–काय वाचावें व कसें वाचावें, सुशिक्षित कसें व्हावें, योग्य विचार करण्यास व आचार करण्यास कसें शिकावें हें ठाऊक नाहीं तें त्यास अवगत करणें हें दुसऱ्या वर्गाच्या बाबतींत ग्रंथालयचळवळीचें ध्येय होय. व तिसऱ्या म्हणजे सुशिक्षित वर्गाला वाचनाची व विचाराचीं साधनें पुरवून अधिक सुशिक्षित, सुविचारवंत ब कार्यक्षम होण्यास प्रवृत्त करणें, चांगले ग्रंथ निर्माण होण्यास साहाय्य करणें हें सुशिक्षितांच्या बाबतींत या चळवळीचें ध्येय होय. अशा तीन प्रकारचें कार्य ग्रंथालयचळवळीचें असावयास पाहिजे. सार्वजनिक ग्रंथालयें व वाचनालयें म्हणजे जनताशिक्षणाची विद्यापीठेंच होत. तीं ज्या मानाने प्रस्थापित होतील, लोक ज्या मानाने त्यांचा फायदा घेतील त्या मानाने जनतेच्या सामान्य ज्ञानाच्या स्थितींत सुधारणा घडून येईल.

आपल्याकडे सार्वजनिक कार्यास मदत करण्याची बुद्धी सुशिक्षितांतही फार अल्प असते हें कबूल करणें प्राप्त आहे. आपल्यापुरतें पहाण्याची वृत्ति फार बलवान ! अगोदर वर्तमानपत्रें व पुस्तकें विकत घ्यायचीं नाहींत. लायब्ररीची आणलेली वाचावीं, पण लायब्ररीचें वर्गणीदार व्हायचें नाहीं, झालेंच तर आणलेली पुस्तकें वेळेवर परत करायची नाहींत, पुस्तकाची काळजी घ्यायची नाहीं, त्यांतली चित्रें वगैरे जुळलें तर फाडून ठेवायचीं, वर्तमापत्रें होतां होईल तों उसनीं घेऊन वाचायचीं, अशी शोचनीय स्थिति पुष्कळ गांवांत आढळून येते. जनतेने ग्रंथकारांस व ग्रंथालयांस उत्तेजन देण्याचें, प्रौढ शिक्षणाच्या कार्यास मदत करण्याचें कार्य जेवढ्या आस्थेने केलें पाहिजे तेवढें केलें नाहीं.

मला मोठ्या खेदाने नमूद करावें लागतें कीं कॉंग्रेस सरकार १९३७ सालीं अस्तित्वांत आलें त्याच्यापूर्वी प्रौढ शिक्षणाच्या क्षेत्रांत सरकारी कार्य जवळ जवळ कां–पूर्ण शून्यच होतें. कॉंग्रेस सरकारने १९३८ सालीं डॉ. क्लिफर्ड

मॅनशार्ट यांच्या अध्यक्षतेखालीं एक प्रौढ शिक्षण समिती नेमली. तिच्या रिपोर्टांत ग्रंथालयांबद्दल बऱ्याच शिफारशी केल्या होत्या. अक्षरज्ञानप्रसाराबद्दलही त्यांनी उपयुक्त सूचना केल्या. त्याप्रमाणें अंमल करण्याची तजवीज करण्यापूर्वीच कॉंग्रेस प्रधानमंडळाने राजीनामा दिला. प्रौढ शिक्षणांत मुंबई प्रांतांत अजून व्हावी तशी वाढ झाल्याचें दिसत नाहीं. आपली जनता साक्षर व सज्ञान झाल्याशिवाय आपणांस सामाजिक, धार्मिक, राजकीय कसलीच प्रगती साध्य होणार नाहीं. आपण ( Adult franchise ) प्रौढ मतदानपद्धति, म्युनिसिपालिट्या व कायदेमंडळासाठीं ज्या निवडणुकी होतील त्यासाठीं सुद्धां, निर्माण करूं इच्छितों. पण जनतेला बरे वाईट निवडण्याची–ज्ञानप्राप्तीची–साधनें प्राप्त करून दिल्याशिवाय–अशा मतदान पद्धतीनें काय दुष्परिणाम होऊं शकेल याचा विचार केला तर ज्ञानप्रसाराच्या–ग्रंथालयचळवळीच्या कार्याचें महत्त्व आपणास तत्काळ दिसून येईल. नाहीं म्हणायला मुंबई शहरापुरती एक प्रौढ शिक्षण कमिटी सरकारने नेमली होती. तिनें गेल्या पाचसहा वर्षांत ८०/८५ हजार लोकांस अक्षरज्ञान करून दिलें आहे. ही कमिटी शहरात दरसाल ५० हजारापर्यंत रक्कम लोकांकडून गोळा करते व तेवढीच रक्कम तिला सरकारकडून मिळते. या कार्यांत पुष्कळ वाढ होण्याजोगी आहे. तिची योजनाही सरकारकडे गेली आहे. पण अजून दाद लागली नाहीं.

नुसतें अक्षरज्ञान करून देणें एवढेंच प्रौढशिक्षणाचें कार्य नव्हे. प्रौढशिक्षणाची व्याप्ति फार मोठी आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे. पण अक्षरज्ञान हें प्रौढशिक्षणाचें एक महत्त्वाचें साधन आहे. त्याकडे दुर्लक्ष करणें अशक्य आहे. आपल्या पूर्वजांना कुठें लिहायवाचायला येत होतें ? पण ते काय रानटी होते का काय ? त्यांनीं नाहीं का सुखानें संसार केला ? ‘ लिहिता कशास ओनामा ? ’ ही विचारसरणी फार घातक आहे. इंग्रजीत ज्यांना तीन ‘रकार’ ( reading, writing and arithmetic ) म्हणतात ते “ लेखन, वाचन व साधें गणीत ” त्याचें तरी ज्ञान निदान प्रत्येक स्त्रीपुरुषास निरपवाद असलेंच पाहिजे. नाहींतर आजच्या जगांत त्यांचा निर्वाह सुरळीत होणार नाहीं, देशाचें पाऊलही पुढें पडणार नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. पण या बाबतींतही कशा प्रकारचा गैरसमज आपल्या देशांतच नव्हे तर सुधारलेला असें मानला जाणाऱ्या

इंग्लंड देशांत अगदी अलीकडे अलीकडे सुद्धां होता, याचा निर्देश श्री. चिं. वि. जोशी यांनीं नगर येथें केलेल्या अध्यक्षीय भाषणांत आढळेल. इंग्लंडांत १६०१ सालीं डॉ. हॉलंड नांवाच्या इसमाने पहिलें सार्वजनिक ग्रंथालय उघडलें. स्कॉटलंडमध्येंही अठराव्या शतकाच्या सुरवातीपासून लायब्ररीचे कायदेसुद्धां पास करण्यांत आले असें असून देखील १८५० सालीं ज्यावेळीं "टाउन कौन्सिलांना लायब्ऱ्या स्थापन करून त्या चालविण्याकरितां लहानसा कर बसविण्याची परवानगी द्यावी " असें बिल पार्लमेंटमध्यें आलें त्यावेळीं त्यालाही विरोध करणारे बहाद्दर पुष्कळ होतेच. एक कर्नलसाहेब तर म्हणाले, " अहो, मला पुस्तकें वाचणें तर मुळींच आवडत नाहीं. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत असतांना मला वाचनाचा असा राग येत असे ! कां म्हणून लोक पुस्तकें वाचतात मला तर समजत नाहीं ! पुस्तकांतून मनाचें खाद्य मिळतें म्हणतात पण आज लोकांना जर कशाची अधिकांत अधिक जरूर असली तर ती पोटाच्या खाद्याची होय. " अनेक इतर सभासदांनींही या बिलाला विरोध केला; पण शेवटीं ऑगस्टच्या १४ तारखेला " पब्लिक लायब्ररीज् ॲक्ट १८५० " हा कायदा पार्लमेंटने पास केला. या ॲक्टाने टाउन कौन्सिलांना ( नगरपालिकांना ) सार्वजनिक ग्रंथालयें व पदार्थ संग्रहालयें ( museums ) स्थापन करण्याचा व त्यासाठीं जी मिळकतीची वार्षिक भाड्याची किंमत ठरली असेल (annual value ) त्यावर दर पौंडास अर्धा पेनी एवढा कर बसविण्याचा व कर्ज काढण्याचा हक्क दिला. पण ॲक्ट लागू व्हायला स्थानिक मतदारांच्या संख्येपैकीं २/३ नीं संमती दिली पाहिजे ही अट घालण्यांत आली. यानंतर लायब्ऱ्यांच्या उन्नतीसाठी अनेक कायदे पार्लमेंटने पास केले व ( लोकल ॲथॉरिटीज् ) स्थानिक स्वराज्य संस्थांना अधिक हक्क देण्यांत आले. त्यांत १९१९ चा कायदा अत्यंत महत्त्वाचा आहे. त्याने पौन्डास पेनी अगर अर्धा पेनी अशी कोणतीच मर्यादा न ठेवतां हवा तेवढा अमर्यादित कर बसविण्याची परवानगी दिली. हे कायदे पास झाले तरी चळवळींची प्रगति मंदच होती. आपल्या शहरांत मोठी ग्रंथालयाची इमारत बांधण्याकडेच प्रथम जनतेचा कल असे; मग पुस्तकें घेण्यासाठी त्यांच्या व्यवस्थेसाठी लायब्ररी ठिकठिकाणीं स्थापन करण्यासाठी त्यांना पैसा पुरत नसे. जेव्हां १८८० ते १९०० या काळांत

अँड्रयू कार्नेजी व पासमोर् एडवर्डस् या दानशूर गृहस्थांनी अत्यंत उदार देणग्या लायब्ररयांसाठी दिल्या तेव्हांच या चळवळीने जोर पकडला. त्याचा इतिहास ज्यांना जाणण्याची इच्छा असेल त्यांना जॉन मिंटो यांच्या A history of public library movement या ग्रंथांत ही सर्व माहिती मिळेल.

## शहरें व खेडीं भिन्न उद्देश

१९२४ सालीं बोर्ड ऑफ एज्युकेशनच्या अध्यक्षांनी इंग्लंडांत लायब्ररयांची तरतूद पुरेशी आहे कीं नाहीं हें तपासून पहाणें, वर निर्दिष्ट केलेल्या कायद्यान्वयें स्थापित झालेल्या ग्रंथालयांची वाढ करणें, त्यांची सुधारणा करणें, व इंग्लंड व वेल्स या देशांत लायब्ररयांची पूर्ण तरतूद करण्याचे उपाय सुचविणें, इत्यादि कामाकरितां सर फ्रेडरिक केन्यन यांच्या अध्यक्षतेखालीं एक बारा माणसांची कमिटी नेमली. त्या कमिटीने पूर्ण चौकशी करून १९२७ सालीं एक विस्तृत रिपोर्ट सादर केला. त्यांत अत्यंत विविध व उपयुक्त माहिती उपलब्ध आहे. हा प्रत्येक ग्रंथालयाचें कार्य करणाऱ्यानें वाचणें जरूर आहे. शहरांत व खेड्यांत ग्रंथालयांची वाढ इंग्लंडांत १९२१ नंतर खूपच झाली. या रिपोर्टच्या एकोणिसाव्या कोष्टकांत इंग्लंडमधील शहरांतील परिस्थितीबद्दल खालील माहिती आहे.

| वर्ष | शहरांतील लोकवस्ती | ग्रंथसंख्या | पौंड खर्चाची रक्कम | दर मा. प्रमाण पौं. शि. पे. |
|---|---|---|---|---|
| १९११ | २२५५९४२७ | ९४१४८२९ | ७२७३०८ | ०—०—८ |
| १९२१ | २२९८७९०३ | १०६७०६७० | ११३०७८९ | ०—१—० |
| १९२४ | २४१६८७०२ | १२३३०९१५ | ११८९५०० | ०—१—० |

हें प्रमाण गेल्या वीस वर्षांनंतर पुष्कळच वाढलें असलें पाहिजे.

शहरापेक्षां खेड्यांतील वस्तीच्या गरजा भिन्न असतात. रिपोर्टाच्या तिसऱ्या विभागांत कौंटी ग्रंथालयांचें काय धोरण असावें हें नमूद केलें आहे. तें येणेंप्रमाणेः

( 1 ) To relieve the tedium of idle hours quite irrespective of intellectual profit or educational

gain. It is sufficient to satisfy this purpose that the rural inhabitant should be rendered a happier ( and not necessarily a more learned ) man by the provision which is made for him.

( 2 ) To secure that the taste of good English which should be acquired in the elementary school is kept alive and developed by a provision of good literature after school years have ended.

( 3 ) To enable the rural inhabitant to acquire without diffculty that general knowledge which alone can enable him to appreciate to the full what he sees and hears.

( 4 ) To impart that knowledge of public affairs and of the history of his own neighbourhood which a citizen must possess if he is to perform with intellegence his duties as a member of the community ultimately responsible for the government of the parish rural district, county and country.

( 5 ) To provide facilities for the study of the arts, trades and professions which constitute the occupation of the inhabitants.

( 6 ) To remove as far as possible all obstacles from the path of the serious student of any subject.

खेड्यांतील बहुजनसमाज विद्वान करण्याचा हेतू नसून अधिक सुखी-वेळाचा सदुपयोग करणारा, भोंवतालची व जागतिक परिस्थिती जाणणारा, आपला कामधंदा अधिक कुशलपणें करण्यास समर्थ-बहुश्रुत कसा बनेल

हा हेतू खेड्यातील ग्रंथालयांच्या चळवळीचा प्रामुख्येकरून असला पाहिजे. मी पाहिले आहे आपल्या प्रांतात आठ आठ दहा दहा हजार वसति असलेल्या अनेक गांवात सुद्धां मोफत वाचनालय अगर सार्वजनिक ग्रंथालय नसतें. मग खेड्यांची गोष्टच कशाला ?

## खेड्यांतील कार्याची दिशा

माझ्या समजुतीप्रमाणे आपण आतां एक पंचवार्षिक प्लॅन आंखावा व त्याचे पहिलें पाऊल सात इयत्तापर्यंत मराठी शाळा असलेल्या प्रत्येक गांवांत सार्वजनिक लायब्ररी स्थापन झाली पाहिजे हें ठरवावें. नुसती वर्गणीदारांना उघडी असणारी लायब्ररी नव्हे तर जेथें मोफत वर्तमानपत्रें व पुस्तकें बसून वाचता येतील व डिपॉझिट ठेवून पुस्तकें वाचण्यास नेता येतील अशी एक चांगली लायब्ररी स्थापन झाली पाहिजे. नंतर हळूहळू बाकीचीं खेडीं घ्यावीं. फिरत्या पेट्यांची लायब्ररी सर्वत्र सुरू करण्याची तजवीज आपण केली पाहिजे. निदान लहानांतल्या लहान खेड्यांत देखील वर्तमानपत्रें वाचण्याची व्यवस्था केली पाहिजे.

## साक्षरता प्रसार व ग्रंथालयें

ज्यांना केवळ अक्षर ओळख होऊन पुढें शिक्षण मिळण्याची कांहीं सोय झाली नाहीं त्यांना ती अक्षर ओळख टिकविणें शक्य होत नाहीं. आतां आपल्या देशांत प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें होण्याचा पुष्कळ संभव आहे. तसेंच प्रौढ शिक्षणाचे व साक्षरता प्रचाराचेही पुष्कळ प्रयत्न चालू आहेत. पण जर या लोकांना वाचनाची गोडी लागेल व अभिरुचि वाढेल अशी पुस्तकें घरबसल्या उपलब्ध झाली नाहींत तर हा सर्व प्रयास फुकट जाणार आहे.

ग्रंथालय चालविणें हें एक शास्त्र असून युरोपांत व अमेरिकेंत ग्रंथालय-शास्त्राच्या अनेक शाळा आहेत. या शास्त्राचा चांगला अभ्यास करून हिंदुस्थानांत कशा प्रकारचीं ग्रंथालयें शहरांत व कशा प्रकारची खेड्यांत असावीत, याचा नीट नकाशा ( Plan ) तयार झाला पाहिजे म्हणजे ग्रंथालय-चळवळीचा प्रसार शास्त्रशुद्ध मार्गानें होईल व ग्रंथालयें उत्तम चालविणारेही पुष्कळ तयार होतील.

मुंबई प्रांतांत २१६५७ शहरें व खेडीं आहेत. त्यापैकीं अजून ४२०१ गांवे अशी आहेत कीं त्या गांवांत किंवा आसपास शिकण्याची इच्छा असली तरी शाळेची सोयच नाहीं. १९४२-४३ चा रिपोर्ट व त्याच्या अगोदरचा १९३७ ते ४२ चा पंचवार्षिक रिपोर्ट पाहिला असतां खालील परिस्थिति आढळून येते.

एकंदर सर्व शिक्षण-संस्थांच्या संख्येंत १९३७ ते ४२ या पांच वर्षांत ८१४२ ची वाढ झाली व त्या २२७५१ झाल्या. मुंबई इलाख्यातील २१५६७ शहरें व गांवें यांत मिळून १९३७ सालीं ८९७५ शाळा होत्या. १९४२ सालीं त्या १३९७६ झाल्या. फक्त ३९ सच मोठाली खेडीं शाळेवांचून राहिलीं. १९४२-४३ चा रिपोर्ट पहातां शिक्षण-संस्थांमध्यें १७९ ची घट झाली. ३९ च्या ऐवजीं ६५ मोठ्या खेड्यांत शाळा नाहींशा झाल्या. १९३७-४२ मध्यें विद्यार्थ्यांच्या संख्येत ३८.९ नी वाढ झाली होती ती १९४२-४३ मध्यें २.५ नी घट झाली. लोकायत्त सरकार असतांना शिक्षणाची झपाट्याने वाढ होते. श्री. परुळेकर यांनी साक्षरतेच्या आंकड्यावर एक निबंध गेल्या वर्षी वाचला. त्यांतलि खालील उतारे मननीय आहेत.

" The census operations of 1941 showed that in the Bombay Province there were twentyone literates in every hundred population while the corresponding number of literates in 1931 was 10. In the previous decades the increase in literacy percentage was about one to two in each decade but between 1931 and 1941 it shot up from 10 to 21. i. e. the percentage increased by 11. This unprecedented increase in literacy during the decade 1931—41 is shared by all parts of India. For India as a whole the literacy percentage has increased from 7 to 12. In former decades it increased by about 1. In Bengal it rose from 9 to

16; in Madras from 10 to 13; in U. P. from 5 to 8; in the Punjab from 5 to 13. No other province approaches Bombay in the rise of literacy percentage. Although in former years Bombay led other provinces in literacy percentage by a fraction only in 1941, it leads others provinces in literaey by a good margin. Bombay leads all provinces with 21 percentage of literacy while Bengal stands second with 16 ... ... ... ... It is well known that the educational qualification in the province of Bombay during the closing year of the decade 1931 to 41 under the congress Ministry was marked by two important and novel features—( 1 ) The literacy campaigns and all that is connected with them and ( 2 ) The opening of voluntary aided Schools on a scale which has no parallel in any other province. Both these measures among other ones must have contributed to the increase in literacy percentage. We shall try to find out the extent of the influence of these measures on the literacy of the Province."

साक्षरतेचें महत्त्व परलोकवासी गोखले यांस केवढें वाटत होतें हें १९१०–११ साली देशांत सक्तीचें शिक्षण सुरू करण्याबाबत त्यांनी जो ठराव मांडला त्यावेळच्या त्यांच्या भाषणांतील खालील उताऱ्यावरून स्पष्ट होईलः—

"The primary purpose of mass education is to banish illiteracy from the land. The quality of

education is a matter of importance that comes only after illiteracy has been banished."

महात्मा गांधींना देखील साक्षरता प्रसाराचें महत्त्व पटलेलें आहे. त्यांच्या विधायक कार्यक्रमांत प्रौढ शिक्षणाला महत्त्वाचें स्थान दिलें असून साक्षरता प्रसार हा प्रौढशिक्षणाचा एक अनुपेक्षणीय भाग आहे असें त्यांनी नुकतेंच आपल्या भाषणांत सांगितल्याचें मला स्मरतें. मतदानाचा हक्क पुष्कळ ठिकाणीं साक्षरते-वर अवलंबून असतो. जनता-शिक्षणाचा सर्व देशांतील इतिहास आपण पहा, साक्षरता प्रसाराचें महत्त्व आपणास निरपवादपणे दिसून येईल. निरक्षरता अशा प्रकारें नष्ट केलीच पाहिजे हें निश्चित झाल्यानंतर, वाचनासाठी अवश्य व इष्ट असे ग्रंथ तयार करणें व ते जनतेस सर्वत्र उपलब्ध होतील असे करणें हें आपलें पुढचें कर्तव्य ठरतें. हे कार्य ग्रंथालय चळवळीचें आहे. मुंबई इला-ख्यांतील ज्या ४००० गांवांत अजून शाळा नाहींत त्यांत शाळा स्थापन करणें व खेडोपाडी स्थायी व फिरत्या ग्रंथालयांची तरतूद करणें हें सरकारनें ताबड-तोब केलें पाहिजे असें कार्य आहे.

खेड्यांत शाळेची इमारत व लायब्ररीची इमारत एकच असूं शकेल; व खेड्यांतील लायब्ररी हें सर्व ग्रामीण जीवनाचें केंद्र बनं शकेल. पूर्वी देवळें हें कार्य करूं शकत होतीं. पण आतां देवळें सार्वजनिक सर्वांगीण प्रवृत्तींचें स्थान या दृष्टीनें निरुपयोगी झालीं असून त्यांची जागा आतां लायब्ऱ्यांनीं घेतली पाहिजे. एक भागांत शाळा व दुसऱ्या भागांत लायब्ररी सभागृह इत्यादि करतां येईल. खेड्यांतील ग्रंथालयाविषयीं मॅनशार्ट कमिटीनें ज्या शिफारशी केल्या त्या रिपोर्टाच्या ३५ व्या पृष्ठावर आढळतात. ( अ ) २० जिल्हा ग्रंथालयें. ( ब ) प्रत्येक जिल्हा ग्रंथालयाखालीं १५ ते २० Group Circulating libraries ( सामूहिक फिरती वाचनालयें ) (क) प्रत्येक सामूहिक वाचनालयाखालीं ५ अगर ६ ग्रामीण फिरती ग्रंथालयें व ( ड ) अदमासे ८००० वाचनालये-( Reading rooms ) असा त्यांचा आराखडा होता. वर वर्णन केल्याप्रमाणें ग्रंथालयें ज्या गांवांत पूर्ण प्राथमिक शाळा असेल त्या सर्व गांवांतून प्रथम स्थापावी. इतर गांवांत वाचनालयें ठेवावी इत्यादि ११ शिफारशी ( ९९-१०९ ) त्यांनीं केल्या. ग्रंथालयांच्या स्थापनाचें व वाढीचें महत्त्व ओळखून पुढें या सर्व

विषयांचा विचार करण्यासाठी मुंबई सरकारने एक स्वतंत्र कमिटीच नेमली. तिच्या रिपोर्टाचा आपण अवश्य विचार कराल अशी मला आशा आहे. आपल्या प्रांतांत सरकारने अजूनपर्यंत ग्रंथालयांच्या अभिवृद्धिसाठीं फारसे प्रयत्न केलेले आढळत नाहींत. मुंबईप्रांतांत गुजराथमध्ये एक, महाराष्ट्रांत एक व कर्नाटकांत एक अशा तीन लायब्ररीअसोसिएशन-ग्रंथालयसंस्था-आहेत; पण अजूनपर्यंत मोठीं शहरें सोडून दिलीं तर इतर ठिकाणीं त्यांचें फारसें कार्य झालेलें दिसून येत नाही. इंग्लंडसारख्या देशांतही कार्नेजी ट्रस्ट या धनाढ्य संस्थेची मदत मिळेपर्यंत ग्रंथालय चळवळीने आंग धरलें नव्हतें हें वर नमूद केलेंच आहे. इंग्लंडमध्यें या चळवळीस प्रथम १८४९ सालीं सुरवात झाली. पार्लमेंटने तेव्हां-पासून आतां पर्यंत नउ-दहा कायदे पास केले तेव्हां आतां कोठें त्यांची चळवळ जोर धरून आहे यांत आश्चर्य कसलें? राजाश्रयावांचून या गोष्टी होणें अशक्य आहे. याचें प्रत्यक्ष उदाहरण म्हणजे बडोदा संस्थानामध्यें ग्रंथालयाबद्दलची झालेली व्यवस्था व इतरत्र असलेली हयगय हें होय. बडोद्यास प्राथमिक शिक्षण सक्तीचें आणि मोफत केलें; व १९१० सालीं सरकारने एक तज्ञ आणून त्याचे सहाय्याने ग्रंथालयाची चळवळ सुरू केली. एक मध्यवर्ती (Central) ग्रंथालय स्थापन केलें. मध्यवर्ती ग्रंथालयाचें कार्य त्रिविध असते. आपले संग्रहांतील पुस्तकें आपल्या वाचकांस व इतर पुस्तकालयांस वाचण्यास देणें, हें एक. इतर संग्र-हालयांत असलेलीं पुस्तकें शोधून काढून तीं आपल्या वाचकांस मिळतील अशी तजवीज करणें, हें दुसरें व देशांत प्रौढ शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना अवश्य तीं पुस्तकें पुरविणें, हें तिसरें असे मध्यवर्ती ग्रंथालयाच्या कार्याचे तीन विभाग इंग्लंडमध्यें केलेले आढळतात. ग्रंथालयांचे अनेक वर्ग पाडतां येतील. मध्यवर्ती ग्रंथालयानंतर प्रादेशिक ग्रंथालयें स्थापन करण्याचें कार्य झालें पाहिजे. आपल्या प्रांतांत महाराष्ट्र कर्नाटक व गुजराथ असे तीन विभाग आहेत. त्यांचेसाठीं प्रादे-शिक ग्रंथालयें स्थापन करणें हे अगत्याचें आहे. या सर्व प्रश्नांचा विचार **ग्रंथालय उत्कर्ष समितीनें** केला, व आपली योजना पुढें मांडली आहे.

आपली परिषद मुंबई, उपनगर व ठाणेजिल्हा एवढ्यापुरती मर्यादित आहे. महाराष्ट्रांत वाचनालयांच्या संघटनेची मुहूर्तमेढ १९२१ सालींच रोंवली गेली. यावर्षीं श्री. द. वा. जोशी प्रभृती कार्यकर्त्यांनीं पुणें येथें महाराष्ट्रांतील

( मोफत ) वाचनालयांची प्रथम परिषद भरविली. बॅ. बाबासाहेब जयकर हे या पहिल्या परिषदेचे अध्यक्ष होते. या परिषदेमध्यें सुमारें ७५ वाचनालयांनी प्रतिनिधि पाठवून भाग घेतला होता. या परिषदेच्या वेळींच महाराष्ट्रीय वाचनालय संघाची प्रतिष्ठापना करण्यांत आली; व संघाचे पहिल्यापासूनचे निष्ठावन्त कार्यकर्ते श्री. द. वा. जोशी यांच्या नेतृत्वाखालीं हा संघ अद्यापही यथाशक्ती कार्य करीत आहे.

वर उल्लेख केलेल्या महाराष्ट्रीय वाचनालय संघाच्या विद्यमाने पुणे येथेंच महाराष्ट्रीय वाचनालय परिषदेचें दुसरें अधिवेशन १९२६ सालीं हैद्राबाद येथील नामदार केशवराव कोरटकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. प्रा. श्री. नी. चाफेकर हे या परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. हें अधिवेशन दोन दिवस चालून त्यांत वाचनालयविषयक चळवळीबाबत दहा महत्वाचे ठराव सम्मत करण्यांत आले. १९२६ पासून सुमारें बारा वर्षे महाराष्ट्रीय वाचनालयांच्या संघटनेचें दृश्य असें कार्य होऊं शकलें नाहीं. १९३९ सालीं अहमदनगर येथें महाराष्ट्रसाहित्य सम्मेलनाचें तेविसावें अधिवेशन भरलें. या अधिवेशनाचा फायदा घेऊन नगर येथेंच ग्रंथालयें व वाचनालयें यांच्या कार्यकर्त्यांची परिषद प्रा. चिं. वि. जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. श्री. कुंदनमल फिरोदिया हे या परिषदेचे स्वागताध्यक्ष होते.

काँग्रेस मन्त्रिमण्डळाच्या कारकीर्दींत ग्रंथालय उत्कर्ष समिती (Library Development Committee) नेमली जाऊन तिनें ग्रंथालय प्रसाराची विस्तृत व शास्त्रशुद्ध योजना पुढें ठेवल्यामुळें ग्रंथालयविषयक चळवळीकडे महाराष्ट्रीय जनतेचें प्रामुख्यानें लक्ष वेधलें गेलें. ठाणे येथील ग्रंथसंग्रहालयाचा सुवर्ण महोत्सव १९४४ सालीं साजरा झाला. या उत्सवाच्या निमित्तानें ठाणे येथील संग्रहालयाच्या कार्यकर्त्यांनी बडोदा येथील सेंट्रल लायब्ररीचे क्युरेटर श्री. त्र्यं. दि. वाकनीस यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई, उपनगर व ठाणे जिल्हा वाचनालय परिषदेचें पहिलें अधिवेशन भरविलें. या अधिवेशनांत पुढील महत्त्वाचा ठराव सम्मत करण्यांत आला.

"वाचनालय संस्था संघटित करणें, त्यांच्या विकासाला अत्यावश्यक असल्यामुळें मुंबई, उपनगर व ठाणे जिल्हा या मधील सर्व वाचनालयांचा संघ स्थापन करण्यांत यावा."

या संघाची घटना तयार करण्यासाठीं सुमारें दहा कार्यकर्त्यांची प्राथमिक समितीहि या परिषदेमध्येंच निवडली गेली. प्राथमिक समितीनें संघाची घटना तयार करून परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनासाठीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयानें दिलेलें आमंत्रण स्वीकारलें व या योजनेनुसार मुंबई, उपनगर व ठाणे जिल्हा वाचनालय परिषदेचें दुसरें अधिवेशन आतां भरत आहे.

परिषदेपुढें मराठी ग्रंथालय संघाची जी घटना मांडावयाची आहे तिचें नांव, उद्देश व साधनें पुढीलप्रमाणें आहेत.

उद्देशः—

अ ) मराठी ग्रंथालयांची व वाचनालयांची संघटना व संवर्धन करून त्यांच्या अभिवृध्यर्थ शक्य त्या मार्गांनी झटणें.

आ ) अन्यभाषीय ग्रंथालयांशीं, वाचनालयांशीं व ग्रंथालयसंघांशीं शक्य त्या मार्गांनीं सहकार्य करणें, व त्यांस सर्व प्रकारें साहाय्य करणें व उत्तेजन देणें.

तूर्त संघाचें कार्य मुंबई, उपनगर व ठाणे जिल्हा यांतील ग्रंथालयांपुरतें मर्यादित राहील.

साधनेंः—

अ ) ग्रंथालयांच्या चळवळीला वाहिलेलें एक नियतकालीक चालविणें.

आ ) मराठी ग्रंथांची अधिकृत व शास्त्रीय तऱ्हेनें वर्गीकृत अशी सूची संपादणें.

इ ) साधारणतः वर्षांतून एकदां वाचनालय परिषद भरविणें.

ई ) ग्रंथ प्रदर्शन भरविणें.

उ ) ग्रंथकार सूची तयार करणें.

ऊ ) अवश्य तर वाङ्मयप्रकाशन करणें.

ए ) या व अशा अन्य उपायांनीं ग्रंथालयांची परिस्थिती सुधारण्याचे शक्य ते प्रयत्न करणें.

आपली परिषद या घटनेचा विचार करील व अवश्य ते फेरफार करून घटना मंजूर करील अशी मला खात्री आहे.

आदर्श ग्रंथालय कसें असावें या विषयाची चर्चा करतांना शहरें व खेडीं यांच्या गरजा भिन्न भिन्न आहेत या गोष्टीचें स्मरण असूं दिलें पाहिजे. डॉ. पी. एम्. जोशी, श्री. पारखी व इतर तज्ञ या परिषदेंत उपस्थित राहिल्यामुळें या विषयावर येथें पुष्कळ प्रकाश पडेल अशी उमेद आहे.

शहरांतील ग्रंथालयें इतर देशांत केवढालीं आहेत तें पाहून आपण आश्चर्यानें थक्क होऊन जातों. मॉस्को येथील " All Union Lenin Memorial Library " ग्रंथालयांत **पंचेचाळीस लक्ष** ग्रंथ व **दोन लक्ष** हस्तलिखितें आहेत. व लेनिनग्राड येथील " Library of the Academy of Science of the Union of the Soviet Socialist Republic " ग्रंथालयांत **साडेएकेचाळीस लक्ष** ग्रंथ आहेत ही रशियाची परिस्थिती आहे. इंग्लंडांत ब्रिटिश म्युझियम लायब्ररींत **एकेचाळीस लाख वीस हजार** ग्रंथ व सत्तर हजार हस्तलिखितें; केंब्रिज युनिव्हर्सिटी लायब्ररींत **पंधरा लक्ष** ग्रंथ व **चाळीस हजार** हस्तलिखितें आहेत. अमेरिकेंतील वॉशिंग्टन येथील लायब्ररी ऑफ काँग्रेसमध्यें **पन्नास लक्ष** ग्रंथ, शिकॅगो युनिव्हर्सिटी लायब्ररींत **बारा लक्ष**, येल युनिव्हर्सिटी **वीस लाख**, हॉवर्ड युनिव्हर्सिटींत **अडतीस लाख**, कोलंबिया युनिव्हर्सिटींत **पंधरा लक्ष वीस हजार** व न्यूयॉर्क सार्वजनिक लायब्ररींत **साडेपस्तीस लाख** याप्रमाणें ग्रंथसंग्रह अमेरिकेंत आहे. जर्मनींत सरकारी ग्रंथालयांत **सव्वीस लाख चाळीस हजार** पुस्तकें व **साडेत्रेसष्ट** हजार हस्तलिखितें; लाइपझिक नगर वाचनालयांत **पावणेदोन लाख** व युनिव्हर्सिटींत **दहा लाख** येणेंप्रमाणें ग्रंथसंपत्ती होती. इटली फ्लॉरेन्स राष्ट्रीय ग्रंथालयांत **पंचवीस लाख** व रोम येथील ग्रंथालयांत **दहा लाख**; स्पेनमध्यें मॅड्रिड् येथील ग्रंथालयांत **पंधरा** लाख याप्रमाणें ग्रंथसंपत्ती होती. त्याच्याशीं हिंदुस्थानांतील ग्रंथालयांची तुलना करावी तर कलकत्ता येथील इम्पिरिअल लायब्ररींत **चार लाख** व युनिव्हर्सिटी लायब्ररींत **एक लाख आठ हजार**; मुंबईत रॉयल एशियाटिक सोसायटीचे लायब्ररींत **एकलाख** व युनिव्हर्सिटी लायब्ररींत **नव्वदहजार**; बडोदा सेंट्रल लायब्ररींत **एकलाख बारा हजार**, हिंदु युनिव्हर्सिटी बनारस लायब्ररींत **पंचाऐशींहजार**, मद्रास युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयांत **ऐंशी हजार** याप्रमाणें ग्रंथसंग्रह आहेत. यासर्वांची बेरीज केली तरी देखील अमेरिका, रशिया, इंग्लंड-

मधील एकेका ग्रंथसंग्रहालयांतील संख्येइतकी होणार नाहीं. अशी आपली परिस्थिती आहे. वर्तमानपत्रांच्या वर्गणीदारांच्या किंवा विक्रीच्या संख्येकडे पाहिलें असतांही एक दोन वर्तमानपत्रेंही पांचदहा लाख प्रती खपणारीं नसावीत हें अडतीस चाळीस कोट लोकसंख्येच्या या प्रचण्ड देशाला लाजिरवाणें नव्हे काय? पाश्चिमात्य देशांत अशीं कितीतरी वर्तमानपत्रें आहेत. पण शिक्षणाचाच जर प्रसार आपल्या देशांत झालेला नाहीं तर यांत आश्चर्य तें कसलें? ही सर्व परिस्थिती आपण हातांत राजकीय सत्ता आल्याशिवाय बदलूं शकणार नाहीं. स्थानिक स्वराज्य संस्थानांही पुष्कळ कार्य करतां येण्याजोगें आहे. म्युनिसिपालट्या व लोकलबोर्ड यांनीं करपट्टी बसवून ग्रंथालयें व म्युझियम कां स्थापन करूं नयेत असें विचारलें तर गरिबीमुळें करवाढ करतां येत नाहीं आणि दुसरें इतकी आस्था व अभिरुचि त्यांच्या ठिकाणीं नाहीं अशी दोन कारणें दिसून येतील.

ग्रंथालय उत्कर्ष समितीनें ज्या सूचना केल्या आहेत त्या माझ्यामतें फार उपयुक्त आहेत. मुंबईत एक मध्यवर्ती (Central) ग्रंथसंग्रहालय असावें व रॉयल अेशियाटिक ग्रंथालय या दृष्टीने योग्य मध्यवर्ती ग्रंथालय होईल हें कोणीही मान्य करील! नंतर भाषाभिन्नत्वामुळे प्रादेशिक ग्रंथालयें पुणें, अहमदाबाद व धारवाड येथें स्थापन करणें इष्ट होईल. प्रादेशिक व मध्यवर्ती ग्रंथसंग्रहालयांना नवीन प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या प्रती दिल्याच पाहिजेत अशी कायद्याने तजवीज करणे भविष्यकाळीं कठीण जाऊं नये. आज ज्या प्रती सरकारला मिळतात त्यांचा जनतेला उपयोग होत नाहीं. The Press and Registration of Books Act XXV of 1867 कलम ९ या सध्यांच्या कायद्याप्रमाणें प्रत्येक छापखान्याच्या मालकाला त्याने छापलेल्या प्रत्येक पुस्तकाच्या तीन प्रती प्रांतिक सरकारकडे पाठवाव्या लागतात. त्यांतल्या दोन इंग्लंडला १ ब्रिटिशम्युझियमसाठी व दुसरी सेक्रेटरी ऑफ स्टेट यांना पाठविण्यात येतात व तिसरी प्रत प्रांतिक सरकारकडे राहाते; पण या प्रतीचा बिनचुक कॅटलॉग ठेवला जात नाहीं. त्यांचा ढीग सरकारी रेकॉर्डकचेरींत पडून राहातो. त्याची मोजदाद व जनतेला पाहिजे तेव्हां मिळण्याची सोय मुळींच नाहीं. इंग्लंडांत दोन प्रती नि येथें एक प्रत व तिची ही दुर्दशा! येथें मुंबई इलाख्यांत लिहिलीं

जाणारीं पुस्तकें मराठी, गुजराथी, कानडी कांहीं थोडीं इंग्लिश व उर्दू असतात. त्यांच्या दोन दोन प्रती विलायतेला व सरकारी गुदामांत अशा पडण्यापेक्षां प्रादेशिक लायब्ररींयांना त्या त्या भाषेंतील पुस्तकें देऊन त्यांची जनतेस मिळण्याची व्यवस्था करण्याचें भाग पाडलें तर पुष्कळच उपयोग होईल. मुंबई प्रांतांत प्रसिध्द होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची, मग तें कोणत्याही भाषेंत असो, एक प्रत मध्यवर्ती ग्रंथालयांत व एक प्रत त्या त्या प्रादेशिक ग्रंथालयांत देण्यासाठीं ग्रंथकर्त्यानें दिली पाहिजे. इंग्लंडांत जर दोन प्रती नाहीं गेल्या तरी अडणार नाहीं. कायद्यानें अशी तजवीज व्हावी अशी मागणी जनतेनें केली पाहिजे.

आपल्या ग्रंथालय उत्कर्ष समितीनें मध्यवर्ती संग्रहालयाच्या कार्याबद्दल खालील सूचना केल्या आहेत—

"Our Central Library will have ( 1 ) to preserve all copy-right books, ( 2 ) to possess a large Collection of rare and costly books so that can spplement the resources of the regional libraries, ( 3 ) to give reference facilities to readers and students, ( 4 ) to co-ordinate the resources of the regional libraries and ( 5 ) to further the library movement in the province and to guide it whenever necessary." असें पांच प्रकारचे कार्य मध्यवर्ती संग्रहालयाकडे सोंपविलें आहे. हें सर्व करण्याकरितां द्रव्याची तरतूद करणें हा एक मोठा अवघड प्रश्न आहे. आपल्याकडेही धनिक लोक नाहींत असें नाहीं; पण त्यांनी आपल्या दातृत्वाचा ओघ या ज्ञानप्रसाराच्या पवित्र कार्याकडे वळविला नाहीं एवढें मात्र खरें.

आपल्याकडील म्युनिसिपालट्या व लोकलबोर्डें या बाबतींत अगदींच उदासीन आहेत. फार तर लायब्ररीला वार्षिक देणगी देतील. पण आपापल्या हद्दींत लायब्ररी–वाचनालयें स्थापन करण्याचें श्रेय कितिकांनी संपादन केलें आहे ? डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्टांतील ५६ कलमाअन्वये ग्रंथालयें म्यूझियम वगैरे स्थापन करून त्यासाठीं पैसे खर्च करण्याचा हक्क म्युनिसिपालिटीला आहे. परंतु या बाबतींतील एकंदर अनास्था अत्यंत दुःखकारक आहे. सरकार

काय त्यांना नको म्हणतें ? पण दोघेही एकाच माळेचे जसे मणि ! ही स्थिती केव्हां दुरुस्त होईल ती होवो. अगोदर आपल्याकडे ग्रंथनिष्पत्तीच बेताबाताची. ग्रंथकर्त्यांच्या मार्गांत अडचणी सर्वच देशांत असतात. सरस्वतींचें व लक्ष्मीचें सर्वत्र वाकडें असतें असें प्रत्ययास येतें. जॉनसनसारख्या विद्वानाला थोड्याशा खर्चाकरितां घाईघाईनें " रॅसेलस " लिहून विकावें लागलें. इतरांनाही कितीतरी हालांत दिवस काढावे लागले होते, पण ही परिस्थिती युरोपांत आतां राहिली नाहीं. आपले येथें मात्र प्रकाशन, छापणें, विकणें या सर्व गोष्टी ग्रंथकर्त्यांना एवढ्या अडचणीच्या होऊन बसतात कीं लेखनास उत्तेजन मिळण्याऐवजीं असलेल्या लेखनबुद्धीचा हिरमोडच व्हावा. सर्वोत्कृष्ट पुस्तक – अत्यंत उपयोगी पुस्तक– अनेक वर्षे मेहनत करून छापून घ्यावें व मग तें खपविण्यासाठीं घरोघर हिंडावें हा दुःसह प्रसंग डॉ. केतकर, ग्रंथसूचिकार श्री. दाते व इतर कितीतरी विद्वान ग्रंथकारावर येतो हें आपणा सर्वांसच ठाऊक असेल ! ही स्थिती सुधारली पाहिजे. या कार्यासही ग्रंथालय चळवळीच्या संघटनेनें चालना मिळेल.

जेथे देशांत बहुसंख्य प्रौढही निरक्षर व त्यांच्यासाठींच ग्रंथालयांचा अभाव आहे तेथें मुलांसाठी वेगळया लायब्ऱ्या कोठून असणार ! बडोदा सोडून दिलें तर मला वाटतें मुलांसाठीं वेगळया, त्यांच्या गरजा विचारांत घेऊन त्यांना अवश्य अशीं उपयुक्त पुस्तकें व इतर साधन सामुग्रीचा संग्रह असलेल्या लायब्ऱ्या कोठेंही अस्तित्वांत नाहींत. मुलांसाठीं अशा ग्रंथालयांची योजना पुरेशी होईल तो सुदीन !

सरकारने या कार्यास पुष्कळ मदत केली पाहिजे हें स्पष्ट आहे. म्हणून जनतेने त्याची उपेक्षा करावी व ' काय करावें सरकार कांहीं करीत नाहीं ' म्हणून स्वस्थ बसावें असें सिद्ध होत नाहीं.

ग्रंथालय चळवळीचें कार्यक्षेत्र फार मोठें आहे. सरकार फार तर मध्यवर्ती व प्रादेशिक ग्रंथालयें स्थापण्यास साहाय्य करील. पण सर्वच कार्य सदोदित सरकारनेंच चालवावें तर त्यांवर सरकारचा कडो अम्मलही अधिक चालेल. म्युनिसिपालिट्या लोकलबोर्डे यांचें सहाय्य त्याच प्रमाणें खासगी देणग्यांचें सहाय्य मिळविणें हें सर्व काम लायब्ररी चळवळीचें आहे. त्यासाठीं सवेतनिक कार्यकर्ते नेमण्याची आपण तजवीज केली पाहिजे. धनिक लोकांना टोचणी लावली पाहिजे. लायब्ररी

परिषदेंत इमारती कशा असाव्या, त्यांत ग्रंथांची मांडणी कशी करावी, कॅटलॉग, वाचनाच्या सोयी, लायब्ररियन व इतर पगारी नोकर, कपाटें व सामानसुमान, ग्रंथालयाची व्यवस्था-कारभार, ग्रंथांचे वर्गीकरण ग्रंथांच्या सूची वगैरे कितीतरी गोष्टींचा समावेश होतो. या सर्व विषयांचा बारकाईने विचार झालेला आहे. तसेंच शाळा कॉलेजांतलि लायब्ऱ्या युनिव्हर्सिटीच्या लायब्ऱ्या, विशिष्ट धंद्याच्या-जसें, कायदा-डॉक्टरी इत्यादि विशिष्ट विषयांच्या मर्यादित लायब्ऱ्या, फिरत्या लायब्ऱ्या इत्यादि सर्व विषय आपल्या कक्षेंत येतात. आपण त्या विषयांचा विचार करालच.

आपल्या, मुंबई शहर, उपनगर व ठाणें जिल्हा या विभागांत गुजराथी भाषा बोलणारांची संख्या पुष्कळच आहे. आपल्या Library movement मध्यें त्यांचा तसाच हिंदी व उर्दू भाषेच्या ग्रंथांच्या लायब्ऱ्यांचा ही विचार केला पाहिजे. सार्वत्रिक मतदान हक्क प्रस्थापित करण्याची आपण मागणी करीत आहोंत. अशा वेळीं सार्वत्रिक ज्ञानप्रसाराचीही चळवळ जोरानें सुरू झाली पाहिजे.

भाषावार प्रांतरचना व दर एक मुख्यभाषा असलेल्या प्रांतांत त्या भाषेची युनिव्हार्सिटी स्थापन करणें जरूर आहे. महाराष्ट्र, गुजराथ व कानडी-भाषा शिक्षणाचे माध्यम असलेल्या युनिव्हर्सिट्या स्थापन झाल्याशिवाय सार्वत्रिक ज्ञानप्रसार होणें कठीण आहे. या भाषा शिक्षणांचे माध्यम करावयाचे झाल्यास त्यांतून सर्व शिक्षण देतां येईल असे ग्रंथ तयार झाले पाहिजेत. आपणांस हें काम प्रत्यक्ष हातांत घेतां आले नाहीं तरी त्याचे महत्व ओळखून त्यास पोषक अशा सर्व प्रवृत्ती आपण केल्या पाहिजेत. त्यायोगें जनतेंत सर्वत्र ज्ञानप्रसार करण्याचे कार्यास चालना मिळणार आहे. उच्च शिक्षणाचें माध्यम सध्यां इंग्रजी भाषा असल्यामुळें ज्ञान जनतेपर्यंत पोचूं (Filter down) शकलें नाहीं. शिक्षणाचें माध्यम मातृभाषाच असली पाहिजे हें तत्व आतां सार्जंट रिपोर्टानेंच नव्हे तर इतर प्रख्यात शिक्षणतज्ञांनी मान्य केलें आहे. याचा परिणाम ग्रंथ-रचना वाढण्यांत होईल व लायब्ररी चळवळीस त्यामुळें खूप जोर येईल.

आपली बहुसंख्य जनता लहान लहान खेड्यांतच राहात असते. मला स्वाभाविकपणे त्यांच्या गरजा काय व त्या कशा भागवितां येतील हा विषय अत्यंत महत्वाचा वाटतो. आपलेकडे नगर, नाशिक, ठाणा, पुणें या शहरांत लायब्ऱ्या

स्थापन होऊन शंभर वर्षे झालीं अगर होत आलीं तरी त्या जिल्ह्यांतील खेड्यांतील जनताही इतर जिल्ह्यांसारखीच अज्ञान, निरक्षर, शाळा नाहींत, लायब्ररऱ्या नाहींत, असली आहे हें पाहून विषाद वाटतो. यापैकीं उपनगर व ठाणा जिल्ह्यांतील खेड्यांची काय प्रगती करतां येईल याचा आपण विचार करावा. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचें कार्य आतां विस्तार पावत आहे. लॅमिंग्टन रोड व दादर येथें शाखा निघाल्या आहेत, हें समाधानकारक आहे. पण अजून नेटाने जनताशिक्षणाचें कार्य आपण करूं लागलों नाहीं हें कबूल केलें पाहिजे. आपल्याला कधीं एखादा कार्नेजी अगर अेड्वर्डस् मिळेल तो मिळो; पण तोंवर स्वस्थ न बसतां आपण काय करायचें ? सरकार काय केव्हां करील ते करो पण आपल्या परिषदेने काय केलें पाहिजे ? मी वर या कार्याचा दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न थोडासा केला आहे.

साहित्यसम्मेलनांतूनही या विषयाबद्दल बराच प्रचार होऊं शकतो. उत्तम ग्रंथसंग्रह म्हणजे एक अमोलिक ठेवा आहे. पण तो सर्वांना उपयुक्त व उपलब्ध झाला पाहिजे. त्याचा उपयोग सर्वांना करतां आला पाहिजे, केवळ श्रीमंतानांच नव्हे. हें लोकशिक्षणाचें द्विविध कार्य आपणांसमोर आहे. पैसा मिळूं शकेल पण त्या कार्याशीं समरस झालेले–तल्लीन झालेले कार्यकर्ते मिळणें कठीण आहे. प्रयत्याने सर्व कांहीं होतें. ग्रंथलेखन, ग्रंथप्रकाशन, ग्रंथसंग्रह, ग्रंथालयप्रसार, प्रौढशिक्षण, विशिष्ट उद्देश साध्य करणारीं वाचनालयें या सर्वांना उत्तेजन देण्याची आपली तयारी व योजना असली पाहिजे. ती कशी करावची हें या परिषदेंत आपण ठरवूं. ग्रंथालय चळवळ ज्ञानप्रसाराची मोहीम ही एक लढाई आहे. देशभर प्रचंड जागृती करून " **शाहाणे करून सोडूं । अवघे जन** " या निश्चयाने प्रांतभर अज्ञान–निरक्षरता नाहींशी करण्याच्या निश्चयाने ग्रंथालय चळवल सुरू करूं. या बाबतींत आपण हिंदुस्थानास धडा घालून दिला पाहिजे. ही लढाई आपण जिंकली तरच हिंदुस्थानचें स्वातंत्र्य–पूर्ण स्वराज्य आपण मिळवूं शकूं; नाहीं तर नाहीं.

बहुधा अध्यक्ष, परिषदेंतील भाषणाच्या सुरवातीसच आपण या थोर पदास कसे सर्वस्वी नालायक आहोंत याचा विनयाने निर्देश करतों. मी त्या भानगडींत पडलों नाहीं हें भाषण ऐकल्यावर आपली खात्री होईलच. पण ते शांतपणें ऐकून घेतल्याबद्दल मी आपले आभार मानतों.

---

# आदर्श ग्रंथालय व भावी काळांतील त्याचें कार्य

आज ह्या सम्मेलनानिमित्त "आदर्श ग्रंथालय व भावी काळांतील त्याचें कार्य" ह्या आजच्या घटकेला अगदीं महत्वाच्या होऊन बसलेल्या विषयावर दोन शब्द बोलण्याची मला आपण जी अमूल्य संधि देत आहांत तीबद्दल मी आपला सर्वांचा कृतज्ञतापूर्वक फार आभारीं आहे.

मी आपणापुढें आतां जें विवेचन करणार आहें तें बरेंचसें वाचकांमध्यें ग्रंथालयाविषयीं आवड निर्माण करण्याच्या दृष्टीने व ग्रंथालयाची अधिकाधिक उपयुक्तता वाढविण्याचे दृष्टीनें ग्रंथपालांना ग्रंथालयांत जी व्यवस्था करावी लागते त्या व्यवस्थेविषयींचें आहे. तेव्हां या विवेचनांत आपणास (१) मुक्तद्वार ग्रंथालयें, (२) ग्रंथांचें वर्गीकरण, (३) ग्रंथ-सूची, (४) संदर्भ-कार्य, (५) प्रसिद्धीकार्य अशा कांही महत्वाच्या विषयांवर थोडी तांत्रिक चर्चा केलेली आढळेल. ती आपण शांतपणे श्रवण कराल अशी मी आशा करतों.

## थोडा इतिहास

ग्रंथालयाची कल्पना ही अगदीं पुरातन कालापासून वृद्धिंगत होत आली आहे. प्रथम प्रथम हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह जेथें केला जात असे, त्या

---

श्रीयुत रघुनाथ शतानंद पारखी यांनी रविवार ता. २१ ऑक्टोबर १९४५ रोजीं "मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा येथील वाचनालयाच्या परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनांत वाचलेला निबंध

स्थानाला सरस्वतीभांडार असें संबोधीत. आपले सर्वश्रेष्ठ धर्मगुरू पुरातन कालीन ऋषी हे चालते बोलते शब्दकोश व ज्ञानकोश होते. त्यांचे आश्रम ही आपल्या मायभूमीचीं पुरातन कालीन ज्ञानाची सदावर्तें अथवा ग्रंथालयें होतीं. वेदवाङ्मयापासून आपल्या ग्रंथसंग्रहांना सुरवात झाली. कालांतरानें हस्तलिखित ग्रंथांचा संग्रह जसजसा वाढूं लागला तसतसें ज्या ठिकाणीं असा संग्रह असेल त्या ठिकाणाला ग्रंथालय असें म्हणत असत. कित्येक शतकें ग्रंथसंग्रह करून ठेवणें म्हणजे मोठें भूषणाचें व मानाचें लक्षण समजलें जात असे व राजे-रजवाडे व धनिक लोक आपल्या सभागृहांत व दिवाणखान्यांत उत्तम नक्षीच्या कपाटांतून आकर्षक बांधणी केलेले ग्रंथ प्रमुख ठिकाणीं ठेवीत असत. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत केवळ ग्रंथसंग्रह करण्याकडे लोकांची फार प्रवृत्ती असे. त्या नंतर ग्रंथांची उपयुक्तता वाढविण्याकरितां असे ग्रंथसंग्रह वाचकांना खुले करण्यांत येऊं लागले. अमेरिका, इंग्लंड व युरोपमधील सुधारलेलीं राष्ट्रें यांनी या बाबतींत विशेष पुढाकार घेऊन सक्तीच्या शिक्षणाबरोबरच ग्रंथालयांचा प्रसारसुद्धां मोठ्या प्रमाणांत सुरू केला; व त्या सर्व राष्ट्रांतून ग्रंथालयांचें महत्व सध्या इतकें वाढलेलें आहे कीं कित्येक आबालवृद्ध मनुष्यांच्या नित्याच्या कार्यक्रमात ग्रंथालयांत जाण्याचा एक महत्वाचा कार्यक्रम समजला जातो. आतांपर्यंत जगांत ज्या ज्या सांस्कृतिक, शैक्षणिक, औद्योगिक, वगैरे सुधारणा होत आल्या आहेत व जे जे नवीन शोध लागले आहेत, त्या सर्वांना ग्रंथालयांचे बहुमूल्य सहाय्य मिळालेलें आहे. आपल्या देशांत आतांपर्यंत ग्रंथालयांच्या प्रसाराकरितां जनतेकडून नाना प्रकारचे प्रयत्न केले गेले आहेत. परंतु त्यांना सरकारचें व धनिकांचें साहाय्य ज्या प्रमाणांत व्हावयास हवें होतें त्या प्रमाणांत अद्याप झालेलें नसल्यामुळे त्यांची प्रगती अगदीं खुंटल्या सारखी झालेली आहे. अखिल भारतीय ग्रंथालय संघ व इतर प्रांतिक संघ यांचें कार्य सध्या हळू हळू वाढत आहे व ग्रंथालयशास्त्राचें शिक्षण देण्याची व्यवस्थासुद्धां निरनिराळ्या विश्वविद्यालयांतून उत्तम प्रकारें झालेली आहे. आजच्या सभेचे माननीय अध्यक्ष हे कॉंग्रेस मंत्रिमंडळाचे मुख्य प्रधान असतांना मुंबई सरकारने ग्रंथालयांच्या प्रसाराकरितां कांहीं योजना आखावी म्हणून प्रि. फैजी, डॉ. जोशी, श्री. कापडी व श्री. कर्वे यांची जी एक समिती नेमली

व त्या समितीने जो अहवाल प्रसिद्ध केला त्या अहवालाचा आपल्या ग्रंथालयांच्या सुधारणेच्या बाबतींत चांगलाच परिणाम झालेला आहे. तो अहवाल इतका नमुनेदार झाला आहे कीं त्यांतील योजना जर अमलांत आणल्या तर फारच थोड्या कालावधींत आपल्या प्रांतांत आदर्शग्रंथालयें आपणास गावोंगावीं दिसूं लागतील व अखिल जनतेची सर्वांगीण सुधारणा करण्यास आपणास फार मदत होईल. मुंबई शहराने मुंबई उपनगर वाचनालय संघ ज्या प्रमाणे स्थापन केला आहे, तसे संघ मुंबईच्या प्रत्येक जिल्ह्यांत स्थापन व्हावयास हवेत; व ते हळू हळू स्थापन होतील अशी दृढ आशा वाटते. आतां आजच्या चर्चेचा जो मुख्य विषय ' आदर्श ग्रंथालय व भावी काळांतलि त्याचें कार्य ' त्याकडे आपण वळूं.

## अमेरिकेचें संदर्भ ग्रंथालय

आदर्श ग्रंथालयाची योग्य कल्पना येण्यास आपणास सध्या फार दूर जाण्याचें कारण नाहीं. ह्या मुंबई शहरांत युद्धाच्या निमित्ताने अमेरिकेच्या सरकारने माहिती खात्याचें जें संदर्भ ग्रंथालय चालविलें आहे त्याला बहुतेक मुंबईकरांनी भेट दिलेली असेलच. तेथील एकंदर व्यवस्था, टापटीप व प्रसन्न वातावरण पाहून कोणाही वाचकास तेथें जास्तींतजास्त वेळ घालवावासा वाटतो. ग्रंथालयांत शिरतांच तो ' आवाज न करणारा व आपोआप मिटला जाणारा ' दरवाजा पाहून आपणाला प्रथमच आश्चर्य वाटतें. तो दरवाजा नेहमींच मिटलेला असल्यामुळे आंत एखादें आदर्शग्रंथालय असेल अशी कल्पनासुद्धा बाहेर जाणाऱ्या येणाऱ्या लोकांना येत नाहीं. आंत जातांना चहूंकडे नजर फिरविल्यास विलक्षण शांत, प्रसन्न व आल्हादकारक वातावरण आपल्या दृष्टीस पडतें. दाराचे आंतले बाजूस ग्रंथालयांत शिरण्यापूर्वी एक वाटोळें मेज ( Counter ) आहे. तेथें प्रत्येक वाचकाने आपलें नांव लिहावें लागतें व आपले बरोबर आणलेल्या वस्तू तेथेंच ठेवावयाच्या असतात. ह्या दोन गोष्टी सुनियंत्रित चालाव्यात व ग्रंथालयांतील ग्रंथ कोणीहि चुकून सुद्धा बाहेर नेऊं नयेत म्हणून तेथें एका सेविकेची योजना केलेली असते. जे वाचक आपल्या वस्तू तेथें न ठेवतील त्यांना ती सेविका त्या तेथें ठेवण्यास नम्रपणे सांगते. शिवाय प्रत्येक वाचकाने ग्रंथालयांत शिरतांना सेविकेशेजारींच मेजावर ठेवलेल्या नोंदवहींत आपलें नांव लिहावयाचें

असतें. जे वाचक नांव न लिहितां पुढें जातात त्यांना तेथें तें लिहिण्यास ती सेविका विनंति करते. आपले ग्रंथालयांतून हीं बंधनें पाळणें म्हणजे अपमानकारक आहे असें कित्येक वाचकांना वाटतें. त्या ग्रंथालयांतील विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट ही कीं तेथें मोठ्या आवाजांत बोलतांना आपणास कोणीही दिसणार नाहीं. ग्रंथलयाचे कामगार वाचकांशी अगदीं लहान आवाजांत नम्रपणे बोलतात व त्या प्रमाणेंच वाचक सुद्धां तेथें शांतता ठेवण्यास मदत करितात. हवानियंत्रित यंत्राच्या सहाय्याने तेथील हवा फारच आल्हादकारक ठेविली जाते; व त्यामुळे कोणासही थकवा, आळस मुळींच येत नाहीं. अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या उत्तम ग्रंथांचा व नियतकालिकांचा संग्रह नादार ( Open shelf ) कपाटांतून तेथें सुव्यवस्थितपणे वर्गवारीने ठेवलेला आपणांस दिसतो. कोणाहि वाचकाला कोणतेंही पुस्तक अथवा नियतकालिक घेऊन कोठेंहि बसण्यास परवानगी असते. तेथील मेज, खुर्च्या, कपाटें, वगैरे लाकडी सामान अगदीं साधें असून त्याची मांडणी आकर्षक केलेली आपणांस दिसते. वाचकांना मदत करण्यास दोन संदर्भ-ग्रंथपाल तेथें सतत फिरत असतात. व कोणत्याही प्रश्नांचीं उत्तरें आस्थापूर्वक वाचकांना दिलीं जातात. ग्रंथांची रचना ड्यूएच्या दशांश वर्गीकरण पद्धतीने केलेली आहे. वाचकांना ग्रंथांचा संदर्भ अल्प वेळांत सांपडावा म्हणून चक्रत्यांची " कोश-सूची " ( Dictionary Catalogue ) तेथें ठेवलेली आहे. त्या सूचींचा उपयोग वाचकांना स्वतंत्रपणे करता येतो. ती कशी पाहावी हें तेथोल संदर्भ ग्रंथपाल मधून मधून निरनिराळ्या वाचकांना समजावून सांगतो. कोणत्याही विषयावर वाचकांना कांहीं माहिती पाहिजे असल्यास तेथील ग्रंथपाल ती देण्यास नेहमीं तत्पर असतात. ग्रंथालय सकाळीं दहापासून सायंकाळीं सहा पर्यंत उघडें असतें. ह्या ग्रंथालयाची मुंबईस स्थापना झाल्यापासून आतांपर्यंत त्याचा लाखो वाचकांनी भरपूर फायदा घेतलेला आहे. तेथें वाचकांना " तुम्ही कोण ? तुम्हांस ह्या ग्रंथालयात बसतां येणार नाहीं. तुम्हास माहिती देण्यास आम्हांस वेळ नाहीं ... ... ..." वगैरे अपमानास्पद वाटणारे प्रश्न विचारले जात नाहींत. तेथील एकंदर वातावरण पाहून वाईट सवयीच्या वाचकाना आपोआप चांगल्या सवयी लागतात. अमेरिकेंत प्रसिद्ध होणाऱ्या प्रमुख नियतकालिकांतून जे महत्त्वाचे लेख वेळोवेळीं प्रसिद्ध केले जातात त्यांतील महत्त्वाच्या

भागाच्या प्रती काढून प्रत्येक विषयावरील " News Letters " आतांपर्यंत त्या ग्रंथालयाने आपल्या देशांतील कित्येत ग्रंथालयांकडे विनामूल्य नियमितपणे पाठविलीं आहेत. ह्या सर्व वर्णनावरून अमेरिका हें राष्ट्र ग्रंथालयांच्या बाबतींत किती पुढें गेलेलें आहे ह्याची जाणीव आपणास होऊं शकेल; व आपल्या ग्रंथालयांची त्या ग्रंथालयांबरोबर तुलना केल्यास आपणांस आपलीं ग्रंथालयें आदर्श करण्यास कोणकोणत्या सुधारणा घडवून आणल्या पाहिजे हें सहज लक्षांत येईल.

## आदर्श ग्रंथालयाची व्याख्या

आपल्या देशांतील ग्रंथपालांचे अध्वर्यु रावसाहेब रंगनाथन् ह्यांनी आपल्या " Five laws of library science " ह्या बहुमूल्य ग्रंथांत आदर्श ग्रंथालयाचीं जीं मुख्य पांच तत्वें विस्तृत करून दाखविलीं आहेत तीं अशी :— (१) ग्रंथ हे वाचकांकरितां आहेत ; (२) प्रत्येक वाचकाला त्याच्या आवडीचें पुस्तक मिळालें पाहिजे ; (३) प्रत्येक पुस्तकास योग्य वाचक मिळाला पाहिजे ; (४) वाचकांचा व सेवकांचा वेळ वांचविला पाहिजे ; व (५) ग्रंथालय ही वाढती संस्था आहे. ह्या पांची तत्वांचें सार अगदीं एका वाक्यांत आणून आदर्श ग्रंथालयाची सोपी व सुटसुटीत व्याख्या करावयाची झाल्यास ती अशी करता येईल—" जें ग्रंथालय कमींतकमी खर्चांत जास्तीत-जास्त वाचकांची ज्ञानपिपासा उत्कृष्टरीतीनें भागवितें तें आदर्श ग्रंथालय होय. अथवा वाचक व ग्रंथ यांचा निकट संबंध घडवून आणण्याकरितां ज्या ग्रंथालयांत आटोकाट प्रयत्न केले जातात त्यासच आदर्श ग्रंथालय म्हणतां येईल. "

## ग्रंथपाल कसा असावा

आदर्श ग्रंथालयाची ही जी व्याख्या आपण ठरविली तिचा हेतू सिध्दीस जाण्यास मुख्यतः बहुश्रुत व ग्रंथालयशास्त्रांत निष्णात असलेले ग्रंथपाल आपले ग्रंथालयांतून असले पाहिजेत. ज्ञानाच्या अंगोपांगांचा व्यासंग केलेल्या ग्रंथपालालाच सांप्रत काळांतील ग्रंथालयांचें नियंत्रण नीट करतां येईल. निर-निराळ्या विषयांवरील अद्ययावत् वाङ्मयाशी ग्रंथपालाचा जितका जास्त परिचय असेल तितकें त्याचें ग्रंथालयांतील काम उठावदार होऊं शकेल. वाचक ग्रंथालयांत आले असतां त्यांनी विचारलेल्या प्रश्नांना शांतपणे योग्य उत्तरें देण्यास जो

ग्रंथपाल समर्थ असेल व तत्पर असेल अशा ग्रंथपालाचीच योजना ग्रंथालयांत व्हावयास हवी. जगांमध्यें वारंवार ज्या उलाढाली होत असतात त्यांची थोडी-बहुत माहिती ग्रंथपालाला असावयास पाहिजे. एखादा वाचक अलंकार शास्त्रावर पुस्तक मागेल तर दुसरा वाचक विमानविद्येवरील ग्रंथांची मागणी करेल. कोणी रसायनशास्त्रावर पुस्तकें मागतील; तर कोणी रशियाच्या शिक्षण-पद्धतीवर पुस्तकें मागतील. कोणी जर्मन भाषेंतील पुस्तकें मागतील; तर कोणी कानडी भाषेंतील पुस्तकें मागतील. अशी विविध पुस्तकें वाचकांना ताबडतोब देण्याची व्यवस्था करणें फार आवश्यक आहे. कांहीं बालवाचनालयें; तर कांहीं महिला-वाचनालयें; कांहीं शालेय ग्रंथालयें, तर कांहीं महाविद्यालयीन ग्रंथालयें; कांहीं शास्त्रीय व औद्योगिक ग्रंथालयें; तर कांहीं सार्वजनिक ग्रंथालयें असें ग्रंथा-लयाचे बहुविध प्रकार आहेत. प्रत्येक प्रकारच्या ग्रंथालयाला तेथें काम करण्यास लायक असा ग्रंथपाल मिळाला व त्याला ग्रंथालयाचें योग्य नियंत्रण करण्यास लागणारा सेवकवर्ग योग्य प्रमाणांत मिळाला म्हणजे तें ग्रंथालय आदर्श होण्यास फारसें कठीण जाणार नाहीं.

## वाचकांना प्रत्यक्ष कपाटांतून पुस्तकें निवडण्याचें स्वातंत्र्य

आपलीं ग्रंथालयें आदर्श करण्यास ज्या सुधारणा करावयास हव्यात त्यांपैकीं पहिली सुधारणा म्हणजे वाचकांना निःसंकोच रीतीने प्रत्यक्ष कपाटांतून ग्रंथांची निवड करण्याचें स्वातंत्र्य देणें ही होय. ह्या स्वातंत्र्यामुळे पुस्तकांच्या कपाटाजवळ वाचक व सेवक नेहमीं जाण्याची शक्यता असल्यामुळे कपाटांना दारें असल्यास त्यांची सारखी उघडझाप करावी लागते. कित्येक दारांचा वरचेवर आवाज होतो; दारें उघडल्यामुळे वाचकांना इकडे तिकडे जाण्यायेण्यास अडथळे होतात. तसेंच दारांमुळे कपाटांतून एकदम ग्रंथ काढतां येत नाहींत. अशा अनेक अडचणींमुळे अलीकडे पुस्तकांच्या कपाटांना दारें न ठेवण्याचाच प्रघात पाश्चिमात्य देशांतील ग्रंथालयांतून पडला आहे. नादार कपाटांतून ग्रंथांची निवड करण्यास वाचकांना सवलत दिल्यामुळे त्यांना हवे असलेले ग्रंथ तर मिळतातच परंतु त्यांना उपयोगी पडतील असे व त्यांना माहीत नसलेले ग्रंथ सुद्धा त्यांच्या नजरेस आल्यामुळे त्यांचा चांगला फायदा होतो. म्हणून नादार कपाटांचा अलीकडे

फार पुरस्कार केला जातो. अशी सोय ज्या ग्रंथालयांतून केली जाते त्यांना मुक्तद्वार (Open Shelf) ग्रंथालयें असें संबोधिलें जातें. मुक्तद्वार ग्रंथालयांतून ग्रंथ नाहीसे होण्याची फार भीती असते. म्हणून अशा ग्रंथालयांच्या दाराचे आंतले बाजूस एका अनुभविक सेवकाची योजना कायमची करणें उचित आहे. त्या सेवकाने कोणाही वाचकाला कोणतीही वस्तु आंत आणू देऊं नये; वाचकांनी ग्रंथालयाचीं परत आणलेलीं पुस्तकें परत घ्यावींत व ज्यांना घरीं वाचावयास पुस्तकें न्यावयाची असतील त्यांना तीं द्यावीत, व ग्रंथालयांत येणाऱ्या जाणाऱ्या वाचकांवर नीट लक्ष ठेवावें. ग्रंथांच्या देवघेवीच्या कामास एक अगर अधिक सेवकांची दाराजवळ स्वतंत्र योजना करणें आवश्यक वाटल्यास ती केली पाहिजे. शिवाय ग्रंथालयांतील कपाटांतून वाचक पुस्तकें निवडीत असतांना त्यांचे जवळपास त्यांना मदत करण्याकरितां व त्यांच्या लक्षांत येऊं न देतां तेथलि ग्रंथ नाहींसे न होतील याबद्दल दक्षता घेण्याकरितां एखादा अनुभविक संदर्भ-सल्लागार फिरता राहणें फार आवश्यक आहे. अशा व्यवस्थेमुळें ग्रंथ नाहींसे होणें बरेंच कमी होईल. शिवाय दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखितें दारें असलेल्या कपाटांतून कुलपांत ठेवावींत व तीं ग्रंथालयांतील कामगारासमोर वाचकांना वाचावयास द्यावींत. अमेरिकेसारख्या पुढारलेल्या राष्ट्रांतून असा अनुभव आहे कीं आपण वाचकांना जितकें जास्त स्वातंत्र्य ग्रंथालयांतून देतों व जितकें आकर्षक व प्रसन्न वातावरण ठेवतों तितकें ग्रंथ नाहींसे होण्याचें प्रमाण कमी कमी होत जातें. त्या तऱ्हेचा अनुभव आपल्या ग्रंथालयांतून यावा म्हणून आपण वाचकांना जितक्या जास्त सवलती देण्याचें ठरविलें असेल तितकी जास्त सुव्यवस्था ग्रंथालयाच्या एकंदर कामांत आपण ठेविली तर बऱ्याच अडचणी दूर होतील अशी खात्री वाटते. तशी व्यवस्था आपल्या बहुतेक ग्रंथालयांतून सध्या केलेली नसल्यामुळे आपणांस बरेच वाईट अनुभव येतात व त्यांचा परिणाम म्हणून आमच्या बहुतेक ग्रंथालयांतून वाचकांना कांहीं बंधनें पाळावीं लागतात व तीं बंधनें कांही वाचक पाळत नसल्यामुळे आपल्या ग्रंथालयांचें नियंत्रण जितकें सुसूत्र चालावयास पाहिजे तितकें चालूं शकत नाहीं व आपल्या ग्रंथालयांविषयीं सहानुभूतीने बोलणारे वाचक आपणांस फार कमी दिसतात. वाचकांचें मन प्रथमच प्रसन्न करण्याकरितां ग्रंथालयाचे मुख्य दाराचे समोर आंतले

बाजूस वाचकांच्या सहज नजरेस पडेल असा एक फलक असावा व त्या फलका-वर " निःसंकोच मदत मागा " हीं अक्षरें असावींत. ह्या फलकामुळे ग्रंथालयाची वाचकांविषयीची कळकळ वाचकांच्या सहज लक्षांत येते व तेथील सेवकवर्ग आपोआप कार्यतत्पर होऊं शकतो आणि वाचक व सेवक यांचेमध्यें निःसीम सहानुभूती व प्रेमभाव निर्माण होतो.

## वर्गीकरण

वाचकांचा कपाटांतील ग्रंथांशीं प्रत्यक्ष संबंध येऊं लागल्यामुळें तेथील मांडणी समाधानकारक ठेवण्याचा प्रश्न आपणापुढें येतो. तेव्हां ही मांडणी कोणत्या पद्धतीने करावी म्हणजे ती सोयीची होईल ? वाचकांच्या सर्वांत अधिक मागण्या ठराविक विषयांच्या अथवा ज्ञानाच्या ठराविक शाखांच्या असतात. अमूक एका विषयावर ग्रंथालयांत कोणते ग्रंथ आहेत हें पहाण्या-करितां बरेच वाचक येतात. अमूक एका ग्रंथकाराचे कोणते ग्रंथ ग्रंथालयांत आहेत अथवा अमूक नांवाचे ग्रंथ ग्रंथालयांत आहेत किंवा नाहींत हे प्रश्न करणारे वाचक थोडे असतात. म्हणून ग्रंथांची मांडणी विषयाप्रमाणें करणें आवश्यक आहे.

कांही ग्रंथालयें ज्ञानाचे प्रमुख दहा पंधरा विभाग करतात व त्या विभा-गांतील ग्रंथ ग्रंथकारनामानुक्रमाने अथवा ग्रंथनामानुक्रमाने लावतात. परंतु दिवसें-दिवस वाचकांना ठराविक विषयावरील सर्व साहित्य— मग तो विषय एखाद्या प्रमुख शाखेचा अगदी बारीक विभाग असला तरी— एकेठिकाणीच सांपडावें असें सहाजिक वाटतें. कारण त्यामुळे त्यांचा बराच वेळ वांचतो. मला एखादें मराठी पुस्तक हवें असें म्हणणारा वाचक विरळा. परंतु मला वामन मल्हार जोशी यांची एखादी कादंबरी पाहिजे, मला फडके यांची अगदी अलीकडील कादंबरी पाहिजे, मला तुकारामावरील सर्व पुस्तकें पहावयाचीं आहेत, ज्ञानेश्वरीवरील टीकात्मक ग्रंथ मला पहावयाचे आहेत, शेक्सपियरच्या Midsummer Night's Dream ह्या नाटकाचीं सर्व मराठी भाषांतरें मला पहावयाचीं आहेत. अशा ठराविक मागण्या पुष्कळ वाचकांकडून सारख्या येत असतात. याकरितां आपल्या ग्रंथालयांतून ग्रंथाचे वर्गीकरण जितकें तर्क-सम्मत व विशद असेल तितकें वाचकांना कपाटांतून ग्रंथ निवडून काढणें किंवा

ग्रंथपालांना त्यांच्या मागण्या समाधानकारक रीतीने पुरविणें जास्त सुलभ जातें. मराठी ललितवाङ्मय हा विषय घेतला तर सर्वसाधारण ग्रंथ प्रथम असावेत. नंतर मराठी काव्य; नंतर मराठी नाटक; नंतर मराठी कादंबरी. मराठी कादंबरींतसुद्धां ग्रंथकारनामाप्रमाणे सर्व कादंबऱ्या लावण्याचा एक प्रकार, कादंबऱ्यांच्या नांवाप्रमाणे कादंबऱ्या लावण्याचा दुसरा प्रकार व कालानुक्रमाने प्रत्येक कादंबरीकाराला बोधांक ठरवून त्याच्या सर्व कादंबऱ्या पुन्हां कालानुक्रमाने लावणें हा एक प्रकार. हा शेवटचा प्रकार सर्वांत उत्तम आहे. कारण त्यांत अमूक एका कालांतील कादंबरीकारांचा गट अभ्यासकाला एकत्र दाखवितां येतो. अलीकडील कादंबरीकारांचे ग्रंथ नेमके शेवटीं सांपडतात. प्रत्येक कादंबरीकाराची सर्वांत अलीकडील कादंबरी शेवटीं सांपडते. ग्रंथांचीं निरनिराळीं भाषांतरें मूळ ग्रंथाजवळ भाषावार लावतां आल्यास बरें. असे नाना तऱ्हेचे मुद्दे अर्वाचीन ग्रंथालयांतील वर्गीकरणासंबंधीं आपणापुढें उभे असतात. म्हणून वर्गीकरण करण्यापूर्वी वर्गीकरणाची सर्वांत उत्तम पद्धती कोणती हें ठरविले पाहिजे. ज्या वर्गीकरण पद्धतीची मांडणी तर्कसम्मत असून मूळ विषयांच्या कालानुक्रमाने वाढणाऱ्या भेदाभेदांचा समावेश जीमध्यें पूर्ण समाधानकारक रीतीने सतत करतां येतो व त्या पोटभेदांना तर्कसम्मत व स्वतंत्र वर्गांक देतां येतात, ती वर्गीकरणपद्धती सर्वांत उत्तम होय. आपण ललितवाङ्मय हा विषय घेतला तर त्याचे भाषावार (१) संस्कृत ललितवाङ्मय, (२) प्राकृत ललितवाङ्मय, (३) मराठी ललितवाङ्मय, (४) गुजराथी ललितवाङ्मय, (५) कानडी ललितवाङ्मय, असे जेवढे खंड पाडावे लागतील तेवढे आपणास पाडतां आले पाहिजेत. ते खंड पाडतांना निरनिराळ्या भाषांचे पृथ्वीच्या निरनिराळ्या खंडांतून पुरातन कालापासून ज्या निरनिराळ्या मनुष्याच्या जाती वाढत चालल्या त्यांच्या मूळ भाषांची प्रथम वर्गवारी करून मग त्या मूळ भाषांपासून उद्भवणाऱ्या उपभाषांची वर्गवारी करावयाची. हा क्रम एखाद्या जातीचा—कुळाचा—घराण्याचा जसा वंशवृक्ष असतो तसा ठेवावयाचा असतो. याला वंशानुक्रमिक, कुळानुक्रमिक अथवा अपत्यानुक्रमिक रचना ( Filiatory Order ) असें म्हणतात. ही ललितवाङ्मयाची अगदीं प्राथमिक स्वरूपाची वर्गवारी झाली. त्यानंतर प्रत्येक वाङ्मयाचे ( १ ) सर्वसाधारण ग्रंथ ( २ ) काव्य ( ३ ) नाटक ( ४ ) कादंबरी ( ५ ) गद्य,

वगैरे उपविभाग व नंतर काव्यग्रंथांची रचना कालानुक्रमाने करावयाची व प्रत्येक कवीला स्वतंत्र वर्गांक देऊन त्याचे सर्व ग्रंथ कालानुक्रमाने लावावयाचे असतात. त्या ग्रंथकारावरील टीकात्मक वाङ्मय एकत्र आणून शिवाय प्रत्येक ग्रंथावरील स्वतंत्र वाङ्मय निर्माण होईल तें स्वतंत्रपणे दाखवितां आलें पाहिजे—असे बहुविध प्रश्न जी वर्ग-पद्धती उत्तम रीतीने सोडवूं शकते तीच पद्धत उपयोगांत आणणें चांगलें.

आपल्या देशांतील ग्रंथालयांना सोयीची अशी वर्गपद्धति बडोदें संस्थानच्या ग्रंथालयाचे प्रमुख वुइल्यम अलान्सन बॉर्डन ( William Alanson Bordon ) यांनी इ. स. १९११ मध्यें तयार केली व ती बडोदें सरकारनें लगेच प्रसिद्ध केली. त्या पद्धतीप्रमाणें बडोदे संस्थानांतील सर्व ग्रंथालयांचें वर्गीकरण केलेलें आहे. त्या पद्धतीचें मराठी रूपांतर बॉर्डन साहेबांनंतर बडोदे ग्रंथालयाचे प्रमुख श्रीयुत जनार्दन सखाराम कुडाळकर यांनी तयार करून इ. स. १९१६ सालीं प्रसिद्ध केलें व पुढें ह्या भाषांतराचीं गुजराथी, हिंदी, वगैरे हिंदुस्थानांतील इतर भाषांतून रूपांतरें होऊन बडोदे संस्थानांतील त्या त्या भाषांतील ग्रंथांचें वर्गीकरण त्या पद्धतीप्रमाणें केलेलें आहे. वास्तविक ज्ञानाच्या शाखांचें भाषावार वर्गीकरण करणें सोयीचें नाहीं. भाषावार वर्गीकरण भाषाशास्त्र व ललितवाङ्मय यांचेंच फक्त करणें सोयीचें आहे. तत्त्वज्ञान, धर्म, समाजशास्त्र, वगैरे विषयांची कोणत्याही भाषांतील पुस्तकें एकत्र ठेवल्याने त्या विषयांवरील एकंदर ग्रंथ वाचकास एकत्र पहावयास मिळतात. तींच पुस्तकें भाषावार लावल्यास तीं एकदम न दिसल्यामुळे कित्येक वाचकांना त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होणार नाहीं म्हणून विषयाला प्राधान्य देऊन कोणत्याही विषयांवरील सर्व भाषांतील ग्रंथ एकत्र आणणें फार सोईचें आहे. जीं ग्रंथालयें फक्त एकाच भाषेंतील ग्रंथ संग्रहित करतात त्यांचे ग्रंथांचे वर्गीकरणाकरितां स्वतंत्र वर्गपद्धतीची आवश्यकता नाहीं. त्यांतील ग्रंथ एका ठराविक सर्वमान्य पद्धतीप्रमाणे लावतां येतात. परंतु बॉर्डन साहेब यांच्या पद्धतींतील विषयदर्शक चिन्हें रोमन लिपीत असल्यामुळे आपल्या नागरी लिपींतील अक्षरें निरनिराळ्या विषयांना ठरवून कै. श्री. कुडाळकर यांनी स्वतंत्र वर्गपद्धतीची मांडणी केली.

डॉ मेलव्हिल डयूए ह्यांच्या दशांश वर्गपद्धतीप्रमाणें आपले देशांतील कित्येक ग्रंथालयांतील ग्रंथांचे वर्गीकरण केलें जातें. ह्या पद्धतींत केवळ संख्यावाचक आकड्यांचाच उपयोग केलेला असल्यामुळें कोणत्याही भाषेची स्वतंत्र ग्रंथालयें या पद्धतीनें लावणें सोयीचें वाटतें. परंतु ह्या पद्धतींत आपल्या भाषा, आपले ललित वाङ्मय, आपलें तत्त्वज्ञान, आपला धर्म व आपला इतिहास यांना नीटसें महत्त्व न दिल्यामुळे साधारणपणें ही पद्धत आपल्या ग्रंथालयांना सोयीची नाहीं.

इ. स. १९३२ मध्यें काशी येथील विद्वान ग्रंथपाल सतीशचंद्र गुहा ह्यांनी आपली वर्गपद्धती प्रसिद्ध केली; व इ. स. १९३३ मध्यें मद्रास विश्वविद्यालयाचे नामांकित ग्रंथपाल रावसाहेब रंगनाथन् यांनी आपली द्विबिंदुवर्ग पद्धति प्रसिद्ध केली.

आपल्या बहुतेक ग्रंथालयांतून ग्रंथांची रचना भिन्न भिन्न पद्धतीप्रमाणें केलेली आहे व त्या सर्व पद्धतींत सर्व ग्रंथालयांना सोयीची पद्धती कोणची याबद्दल ग्रंथपालांची अद्याप एकवाक्यता झालेली नाहीं. हा विषय फार महत्त्वाचा असल्यामुळें त्याचा विचार दिवसेंदिवस विशेष बारकाईनें व्हावयास पाहिजे. आपल्या देशांतील सर्व ग्रंथालयांना एकच वर्गपद्धती ठरविल्यास ग्रंथालयांच्या व वाचकांच्या दृष्टीनें फार सोईचें होईल.

रंगनाथन् यांची वर्गपद्धती व इतर वर्गपद्धती यांच्यामधील मुख्य फरक हा आहे कीं इतर पद्धतींत विषयांना ठराविक वर्गांक देऊन ठेवलेले असतात; परंतु रंगनाथन् यांच्या पद्धतींत प्रत्येक वर्गाचे मूळ विभाग देऊन त्यांचे उपविभाग करण्याचे नियम ठरविले आहेत. त्या नियमाप्रमाणें आपणांस आवश्यक असलेले उपविभाग तयार करता येतात. उदाहरणार्थ " ललितवाङ्मय " हा वर्ग आपण घेतल्यास त्याचे भाषावार विभाग दिलेले आहेत व प्रत्येक भाषेच्या ललितवाङ्मयाचे उपविभाग करण्याचे नियम दिले आहेत. त्या नियमाप्रमाणें प्रत्येक वाङ्मयाचे प्रथम काव्य, नाट्य, कादंबरी, गद्य, असे विभाग पाडून त्या त्या विभागांतील ग्रंथ प्रत्येक लेखकाला स्वतंत्र वर्गांक देऊन लावतां येतात. ह्या वर्गांकामध्यें लेखकाचें जन्मवर्ष दाखविणारीं चिन्हें असतात. त्यामुळें ललितवाङ्मयाच्या प्रत्येक विभागातील ग्रंथ कालानुक्रमाने आपोआप लागले जातात व

प्रत्येक ग्रंथकाराचे त्या विभागांतील सर्व ग्रंथ एके ठिकाणीं कालानुक्रमाने लावतां येतात. रावसाहेब रंगनाथन् यांनीं वर्गशास्त्राचा सखोल अभ्यास करून आतां-पर्यंतच्या वर्गपद्धतींत जे जे दोष त्यांना आढळले ते ते त्यांनी आपल्या वर्ग-पद्धतींत येऊं न देण्याची पराकाष्ठा केलेली आहे. ह्या पद्धतीने वर्गांक तयार करतांना ज्या ग्रंथांना आपणास वर्गांक द्यावयाचे असतात त्यांची आपणांस जितकी माहिती होते तितकी माहिती इतर पद्धतीमुळें होत नाहीं; व त्यामुळें इतर पद्धतीप्रमाणें वर्गीकरण केलें तर वाचकांना मदत करण्यास लागणारी पात्रता जितकी उच्च दर्जाची असावयास पाहिजे तितकी ती राहूं शकत नाहीं. ज्ञानाच्या नवीन नवीन सुधारणांशीं तादात्म्य होण्यास व त्या त्या सुधारणांप्रमाणें नवीन नवीन वाङ्मय ग्रंथालयांत येतांच त्याला तत्काळ योग्य स्थान ठरविण्यास ह्या पद्धतीचा अभ्यास आपणास बराच उपयोगी होईल अशी खात्री वाटते. ह्या पद्धतींत रोमन अक्षरांचा उपयोग केलेला असल्यामुळें व तिचे वर्गांक बन-विण्याचें काम ग्रंथपालांना जरा कठीण वाटत असल्यामुळें तिचा जसा प्रसार आतापर्यंत व्हावयास पाहिजे होता तसा तो अजून झालेला नाहीं. ह्या पद्धतीच्या उत्कृष्टतेबद्दल वर्गशास्त्रप्रवीण असलेल्या आंतरराष्ट्रीय नामवंत ग्रंथपालांनी धन्योद्गार काढलेले आहेत.

वर्गशास्त्राचा तर्कशास्त्राशीं अगदीं निकटचा संबंध असल्यामुळें ज्यांनीं तर्कशास्त्राचा नीट अभ्यास केलेला नाहीं त्यांना ग्रंथालयाच्या वर्गशास्त्राशीं ओळख करून घेणें साहजीकच कठीण वाटणार. आतांपर्यंत आपल्या ग्रंथालयां-तून पुस्तकांना दिलेल्या वर्गांकापासून पुस्तकांच्या ठराविक विषयाचा बोध होत नसे. इंग्रजी विभागाचें पांच क्रमांक असलेलें पुस्तक, मराठीच्या काव्य विभा-गांतील सत्तावीस क्रमांक असलेलें पुस्तक अथवा तिसऱ्या खोलींतील पांचव्या कपाटांतील दुसऱ्या कप्यांतील सातवें पुस्तक एवढाच अर्थ वर्गांकापासून आतां-पर्यंत आपणास मिळत असे. अमेरिकेंतील ग्रंथालयांच्या चळवळीचे जनक डॉ. मेलव्हिल डयूए यांनी ही जुनी पद्धत मोडून तर्कशास्त्राच्या सहाय्याने ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांचे जास्तीत जास्त विभाग पाडून त्यांना वर्गांक ठरवून दिले व त्यांची संदर्भसुलभ अशी सूची तयार केली. तीवरून कोणाही ग्रंथपालाला ठराविक विषयाच्या ग्रंथांना विषयदर्शक वर्गांक देणें सोयीचें झालें. परंतु दिवसें

दिवस ज्ञानामध्यें जशी भर पडत आहे तसतशा नवीन उद्भवणाऱ्या विषयांना योग्य वर्गांक वर्गपद्धतीकाराच्या सहाय्याशिवाय ठरविणें वर्गकाराला कठीण वाटतें. तो कठीणपणा अथवा ती अडचण दूर व्हावी व वर्गकारांचें वर्गीकरणाचें ज्ञान व तें नीट करण्याची त्यांची पात्रता वाढावी म्हणून रंगनाथन् यांनी आपल्या नवीन पद्धतीची नवीन तऱ्हेनें मांडणी केलेली आहे. तिचा सखोल अभ्यास करून तिचा प्रसार आपल्या देशांत करणें हें आपल्या देशांतील प्रत्येक ग्रंथपालाचें आद्य कर्तव्यकर्म आहे.

## ग्रंथसूची

ग्रंथांची मांडणी तर्कसम्मत केल्यामुळें वाचकांना कपाटांतील ग्रंथ अल्प वेळांत मिळण्याची सोय झाली असली तरी ग्रंथालयांतील त्या सर्व ग्रंथांची एक संदर्भ सुलभ अशी ग्रंथसूची तयार करण्याची आवश्यकता आहे. कांहीं पुस्तकांतून निरनिराळ्या ग्रंथकारांनीं लिहिलेले निबंध असतात, अथवा एखाद्या विषयाचा संबंध इतर निराळ्या गटांत असलेल्या विषयांशी येतो. तसेंच वाचकांना कित्येक वेळीं अमूक ग्रंथकाराचे कोणते ग्रंथ ग्रंथालयांत आहेत याबद्दल माहिती लागते. केव्हां केव्हां त्यांचें लक्षांत पुस्तकाचें नांवच फक्त असतें. अशा वेळीं ह्या सर्व प्रश्नांची योग्य उत्तरें वाचकांना देण्याकरितां एक वर्ग सूची व दुसरी संदर्भसूची अशा दोन सूचींची फार आवश्यकता आहे. वर्ग सूचींत चक्त्यांची मांडणी कपाटांतील ग्रंथांच्या मांडणीप्रमाणें केलेली असते; व शिवाय तीमध्यें ज्या विषयांचे निरनिराळ्या इतर विषयांशी संबंध येतात त्यांचे संदर्भ स्वतंत्र रीतीने दाखविले जातात. वर्गसूचीचा उपयोग वाचकांना सुलभतेनें करतां यावा म्हणून संदर्भसूची तयार केलेली असते. ह्या सूचींत ग्रंथकारांच्या नांवांना प्रामुख्य देऊन तयार केलेल्या चक्त्या, विषयांच्या नांवांच्या चक्त्या, ग्रंथमालांच्या नांवांच्या चक्त्या, व इतर सर्व आवश्यक चक्त्या कोशपद्धतीने लावलेल्या असतात. व म्हणून ही सूची पहावयास सोपी असते. ह्या सूचींतील चक्त्यांवरून दिलेल्या बोधांकांच्या सहाय्याने वर्ग-सूचीचा उपयोग वाचकांना सहज करतां येतो. ग्रंथालयांतील कामगारांना वर्ग पद्धतीची माहिती असल्यामुळें त्यांना सूचीचा उपयोग करण्यास वाचकांना मदत करतां येते. ह्या दोन सूचींमुळें वाचकांचा व ग्रंथपालांचा बराच वेळ वांचतो; व त्यांना हवे

असलेले संदर्भ अल्प वेळांत सुलभतेने सांपडतात. अशा सूची आपल्या सर्व ग्रंथालयांतून करणें फार आवश्यक आहे.

## स्थान निर्देश फलक

ग्रंथांची मांडणी उत्तम प्रकारें केली व ग्रंथ-सूची योग्य पद्धतीने तयार केल्या तरी ग्रंथालयांतील कपाटांची मांडणी वाचकांच्या सहज लक्षांत येण्याकरितां ( १ ) रांगांचे फलक, ( २ ) कपाटांचे फलक, ( ३ ) कप्प्यांचे फलक असे निर्देश फलक ( Guide Boards ) संग्रहालयांत चहूंकडे लावले तर तेथलि रचना वाचकांचे सहज लक्षांत येऊं शकते; व ग्रंथपालाचा वेळ न मोडतां प्रत्येक वाचक आपापलीं पुस्तकें सहज निवडूं शकतात. अशा फलकांची योजना प्रत्येक ग्रंथालयांत करावयास पाहिजे.

## संदर्भ ग्रंथपाल

ग्रंथालय आदर्श करण्याकरितां आतांपर्यंत आपण ज्या तांत्रिक साधनांचा विचार केला त्या सर्वांची उपयुक्तता वाचकांना पटविण्याकरितां, ग्रंथालयांत वेळोवेळीं जे नवीन वाचक येतात त्यांना ग्रंथालयाचा उत्तम उपयोग कसा करून घ्यावा ह्याविषयीं माहिती देण्याकरितां, निरनिराळ्या वाचकांच्या बहुविध प्रश्नांचीं समाधानकारक रीतीने उत्तरें देण्याकरितां व ग्रंथालयांतील एकंदर वातावरण प्रफुल्लित ठेवून ग्रंथालयांत येणाऱ्या वाचकवर्गांची संख्या वाढविण्याकरितां, बहुश्रुत व संदर्भ कामांत निष्णात असलेला संदर्भ-ग्रंथपाल प्रत्येक ग्रंथालयांत असावयास पाहिजे.

ग्रंथालयांत निरनिराळे वाचक नानातऱ्हेचे प्रश्न विचारतात. कोणास एखाद्या शास्त्रीय विषयाची माहिती हवी असते तर कोणास एखाद्या प्रसिद्ध व्यक्तीचें चरित्र हवें असतें; कोणास नाट्यशास्त्रावरील ग्रंथ हवे असतात तर कोणास मुंबईसारख्या मोठमोठ्या शहरांतील कांहीं व्यक्तींचे, कांहीं दुकानांचे व इतर निरनिराळ्या संस्थांचे पत्ते व इतर माहिती पाहिजे असते. असे विविध प्रकारचे प्रश्न संदर्भ ग्रंथालयांतून विचारले जातात. हें काम ग्रंथालयांतील इतर कामापेक्षां फार महत्त्वाचें आहे. तें उत्तम करण्यास ग्रंथपालाला विविध माहिती वेळोवेळीं जमवून ठेवावी लागते, निरनिराळ्या ग्रंथांशी दृढ परिचय

ठेवावा लागतो, निरनिराळे ज्ञानकोश व संदर्भकोश यांची चांगली माहिती मिळवावी लागते. अशी माहिती ज्या ग्रंथपालाने चांगली मिळविली आहे त्यालाच संदर्भकाम चांगल्या रीतीने करितां येईल; व त्याने विविध वाचकांना विविध तऱ्हेची जी महत्त्वाची मदत केली असेल तिचा सुपरिणाम असा होतो कीं त्या ग्रंथालयाचा वाचकवर्ग कल्पनेच्या बाहेर वाढतो; धनिक वाचक मोठाल्या देणग्या देऊन आपली कृतज्ञता व्यक्त करितात व ग्रंथालयाची एकंदर भरभराट विनासायास होऊं शकते असा पाश्चिमात्य देशांतील ग्रंथालयांचा अनुभव आहे.

योग्य वाचकाला, योग्य वेळीं, योग्य पुस्तक देण्याकरितां वाचकाचा चालता बोलता मार्गदर्शक अथवा मदतनीस ज्या ग्रंथालयांत आहे तें ग्रंथालय कोणत्याही परिस्थितींत आदर्श करणें फार कठीण जाणार नाहीं.

## चांगल्या ग्रंथांना प्रसिद्धी

ग्रंथालयांत निरनिराळ्या विषयांतून जे चांगले ग्रंथ असतात ते वाचकांच्या सहज लक्षांत यावेत म्हणून त्याचे निरनिराळे गट संदर्भग्रंथपालाने मधून मधून वाचकांच्या सहज लक्षांत येतील अशा प्रमुख ठिकाणीं ठेवावेत व त्याचे कपाटावर " आपण हे ग्रंथ पाहिले आहेत काय ? ते आपणास कदाचित् आवडतील " असा फलक लावावा. तसेंच " गेल्या वर्षांतील वाचकांच्या आवडीचे ग्रंथ, " गेल्या सहा महिन्यांतील वाचकांच्या आवडीचे ग्रंथ " असे ग्रंथालयांत त्या त्या काळांत घेतलेले ग्रंथ प्रमुख ठिकाणीं ठेवावेत. चांगल्या ग्रंथांना योग्य प्रसिद्धी देण्याचा हा सर्वांत उत्तम उपाय आहे.

## प्रसिद्धीकार्य

आतांपर्यंत ग्रंथालयांत येणाऱ्या वाचकांची सोय आदर्श करण्यास लागणाऱ्या साधनाचा विचार आपण केला. एवढ्यानें ग्रंथालयाच्या मुख्य उद्देशाची सफलता होत नाहीं. ग्रंथालयात जे वाचक येत नाहींत अशा कित्येक वाचकांना ग्रंथालयाची माहिती व्हावी म्हणून कांहीं उपाय योजावे लागतात. त्याकरितां एखादी ग्रंथालयपत्रिका नियमितपणें प्रसिद्ध करून अशा वाचकांकडे पाठविणें अगत्याचें आहे. ह्या पत्रिकेंत ग्रंथालयाची विविध माहिती द्यावी. ग्रंथालयाच्या संग्रहाचे वैशिष्ट्य, ग्रंथालयांत वाचकांकरितां केलेल्या सोयी, ग्रंथालयांत निय-

मित येणाऱ्या नियतकालिकांची यादी, ग्रंथालयांत असलेल्या मौल्यवान ग्रंथांची यादी, नवीन आलेल्या ग्रंथाची यादी, एकंदर ग्रंथसंख्या, वाचकांची संख्या, वगैरे माहिती आकर्षक रीतीनें ग्रंथालयपत्रिकेंत द्यावी. अशा प्रकारची माहिती निरनिराळया वर्तमानपत्रांतून मधून मधून प्रसिद्ध करावी. ह्या पद्धतीचा परिणाम असा होतो कीं बऱ्याच लोकांना ग्रंथालयाची माहिती सहज मिळते व त्यामुळें ग्रंथालयाचा वाचकवर्ग वाढतो व त्याची उपयुक्तता कल्पनेच्या बाहेर वाढते.

## उपसंहार

ग्रंथालय आदर्श करण्यास अशा प्रकारचे प्रयत्न करावयास पाहिजेत. त्यामुळें बहुजनसमाज सुसंस्कृत व सुविद्य करण्यास मोठी मदत होऊन देशाच्या एकंदर भरभराटीला बरीच चालना मिळूं शकेल. सध्यां शिक्षणाच्या व इतर नानाविध सुधारणेच्या ज्या मोठमोठया योजना होत आहेत त्या प्रत्येकींत ग्रंथालयांना फार मोठें स्थान आहे. कोणतेंही शिक्षण घ्या, कोणताही धंदा घ्या अथवा समाजाच्या व्यापाराचें व व्यवहाराचें कोणतेंही अंग घ्या—ह्या सर्वांना सध्याच्या काळांत आदर्श ग्रंथालयांची विशेष आवश्यकता आहे. ग्रंथालयांच्या मदतीविना जगांतील कोणत्याही कामांत सुधारणा होणार नाहीं. जगांतील बहुविध ज्ञानाचा परामर्ष वाचकांना ग्रंथालयांत जितका स्वतंत्रपणें व शांतपणें घेतां येतो तितका त्यांना कोठेंहि घ्यावयास मिळणार नाहीं. स्वातंत्र्य, स्वावलंबन, सहिष्णुता, ऐक्य वगैरे सद्‌गुणाचे धडे आदर्श ग्रंथालयांतूनच वाचकांना चांगले शिकतां येतात. शिक्षणाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेपासून ग्रंथालयाची उत्तम सोय करण्यास व तिचें महत्त्व वाढविण्यास आपण आपल्या भाषेंत मौल्यवान ग्रंथ लिहून ग्रंथालयांचे द्वारें बहुजन समाजाला त्यांचा आस्वाद घेण्याची सोय केली पाहिजे. मुंबईसारख्या सर्वांत मोठ्या शहरापासून दहा पांच घरें असलेल्या बारक्या खेड्यापर्यंत ग्रंथालयांची एक भक्कम सांखळी तयार व्हावयास पाहिजे. असें झाल्याशिवाय बहुजन समाजाच्या शिक्षणाची व ज्ञानाची सुधारणा होणार नाहीं. आपल्या मातृभाषांचें महत्त्व वाढविण्यास व त्यांच्या प्रसाराची वाढ सतत चालूं ठेवण्यास ग्रंथालयांइतकी तेजस्वी व उपयुक्त अशी दुसरी संस्था नाहीं. हें काम आपल्या मातृभाषेला वाहून घेणारीं ग्रंथालयेंच उत्तम प्रकारें करतील. जस-

जशी ग्रंथालयांची संख्या वाढत जाईल तसतशी ग्रंथांची निर्मिती वृद्धिंगत होऊन अमूक विषयावर आपल्या मातृभाषेंत ग्रंथ नाहींत असें होणार नाहीं. मुंबई अगर पुणे येथें मराठीचें एक केन्द्र ग्रंथालय निर्माण करून महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यांतून व तालुक्यांतून उपग्रंथालयें असावींत. सध्यां प्रत्येक जिल्ह्याच्या व तालुक्याच्या मुख्य शहरांत एखादें दुसरें ग्रंथालय पहावयास सांपडतें. परंतु त्यांतलि बरींच ग्रंथालयें नुसतीं नांवालाच आहेत असें म्हणावें लागतें. बडोदे संस्थान हिंदुस्थानांतील अर्वाचीन ग्रंथालयांचें जन्मस्थान आहे. तेथील ग्रंथालयांचे सुधारणेला राजाश्रय मिळाल्यामुळें बडोद्याचें उदाहरण सर्व हिंदुस्थानला मार्गदर्शक झालें आहे. जसें जनतेच्या शैक्षणिक सुधारणेचें कार्य सरकार व स्थानिक स्वराज्यसंस्था यांचें आहे तसें तें शिक्षण जनतेंत रुजविण्यास व वाढीस लावयास आदर्श ग्रंथालयांचा प्रसार करण्याचे त्यांचेंच मुख्य कर्तव्य आहे. परंतु जोपर्यंत ह्या संस्था आपलें कर्तव्य योग्य प्रकारें बजावीत नाहींत तोपर्यंत जनतेनें स्वस्थ बसणें चांगले नाहीं, व म्हणून आपणच पुढाकार घेऊन आपणांतील धनिक नागरिकांनीं या कार्यास लागणारे सांपत्तिक सहाय्य करावें म्हणून चिकाटीने प्रयत्न करावयास हवेत. अशा ह्या समाजाच्या संस्कृतिसंवर्धनांच्या कार्यांत ह्या संमेलनाचे माननीय अध्यक्ष श्रीयुत बाळासाहेब खेर व माननीय स्वागताध्यक्ष श्री. डॉ. जोशी यांच्या मार्गदर्शनाचा आपणास चांगला उपयोग होणार आहे.

---

# मराठी ग्रंथालयांची सद्यःस्थिति
# व
# तीं आदर्श करण्याचे मार्ग

ग्रंथालय म्हणजे ग्रंथांचें आलय किंवा घर. ग्रंथघर इतका संकुचित अर्थ अर्वाचिन कालीं कोणी स्वीकारणार नाही. जेथें वाचकांच्या वाचनविषयक सर्व प्रकारच्या गरजा भागविण्यासाठीं ग्रंथसंग्रह करण्यांत येतो, त्या मंदिराला हल्लींच्या कालीं ग्रंथालय असें म्हणतात.

इंग्रजी राजवट होण्यापूर्वी—म्हणजे मुद्रणकला हिंदुस्थानांत अवतरण्यापूर्वी ग्रंथकार आपले ग्रंथ कागदावर किंवा फार पूर्वी भूर्जपत्रावर किंवा ताडपत्रावर लिहीत असत. या ग्रंथांच्या नकला करण्याचें म्हणजे प्रती करण्याचें काम करणारे त्या कालीं पुष्कळ व्यवसायी असत. यामुळें मुद्रणकला अस्तित्वांत नसूनसुद्धां ग्रंथकारांच्या ग्रंथांचा पुष्कळच प्रसार पूर्वीसुद्धां होत असे. या कालामध्यें विद्येचा सारा मक्ता शास्त्री, पुरोहित, ज्योतिषी इत्यादि ब्राह्मणांस मिळालेला असल्यामुळें त्यांचेकडे हस्तलिखित ग्रंथांचा मोठा संग्रह असे. हा संग्रह फक्त घरमालकाच्या वैयक्तिक उपयोगासाठीं राखलेला असला तरी त्यांतील ग्रंथ शेजारीपाजारी, इष्टमित्र हे वाचावयास नेल्याशिवाय काय रहात असतील? असें नसतें तर—

---

श्रीयुत शंकर गणेश दाते यांनीं रविवार ता. २१ आक्टोबर १९४५ रोजीं मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा येथील वाचनालय परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनांत वाचलेला निबंध

पुस्तकं वडवा बाला परहस्तगता गता ।
कदाचित् पुनरायाता नष्टा भ्रष्टा च मर्दिता ॥ १ ॥

किंवा

तैलाद्रक्षेज्जलाद्रक्षेद्रक्षेत्शिथिलबंधनात ।
मूर्खहस्ते न दातव्यमेवं वदति पुस्तकम् ॥ २ ॥

अशासारखे वाचकांसंबंधी धोक्याची सूचना देणारे श्लोक ग्रंथलेखकांनीं कशाला लिहिले असते ? पण एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. आज ज्या अर्थानें ग्रंथालयाला आपण सार्वजनिक संस्था म्हणतों त्या अर्थानें पूर्वी एकही संस्था आपल्या देशांत होती असें वाटत नाहीं. याचाच अर्थ अशा संस्थेचा आपल्या लोकांना पूर्वी कधींही परिचय नव्हता.

इ. स. १८१८ मध्यें महाराष्ट्रांत इंग्रजांचे राज्य स्थापन झालें आणि त्याच समयीं आमची सगळी अक्कल लयाला गेली ! यामुळें पागल बनलेल्या आम्हां अज्ञान प्रजाजनांना सज्ञान करण्याकरितां ज्या कांहीं अजब चिजा बाहेर पडल्या, त्यांतच 'Native General Libraries' नामक संस्थांचा मी समावेश करतों. अशा नावाच्या संस्था १८३८ ते अंदाजें १८६८ पर्यंत पावसाळ्यांत छत्र्या उगवतात त्याप्रमाणें महाराष्ट्रांतील निरनिराळ्या लहानमोठ्या शहरीं भराभर स्थापन झाल्याचें दिसतें. ज्या लोकांना इंग्रजी अमलापूर्वी सार्वजनिक संस्था सहकार्यतत्त्वावर चालविण्याची कल्पनाही नव्हती, तेच लोक इंग्रजांशीं संबंध येऊन थोडीं वर्षे लोटतात न लोटतात, तोंच तशा संस्था स्थापन करूं लागतात हें दृश्य पाहून माझ्या मनाला मोठा चमत्कार वाटतो. सरकारी दप्तरखान्यांतील जुने कागदपत्र तपासले तर जिल्हाधिकाऱ्यांना व युरोपियन न्यायाधिकाऱ्यांना, अशी चळवळ सुरू करण्याबाबत एखादा गुप्त खलिता सरकारकडून निघाल्याचें उघडकीस येईल असें मला वाटतें. एखाद्या दीर्घोद्योगी संशोधकाने हा उद्योग जरूर करून पहावा. हीं नेटिव्ह ग्रंथालयें केव्हां व कोठें निघालीं तीं पहा. अहमदनगर १८३८; नाशिक १८४०; मुंबई १८४५; पुणें, बेळगांव १८४८; ठाणें, कोल्हापूर १८५०; सातारा, सावंतवाडी १८५२; मालेगांव कॅम्प १८५३; धारवाड १८५४; सोलापूर १८५७; धुळें, वसई १८६३; कल्याण १८६४; उरण, भिवंडी, हुबळी १८६५; पेण, अलिबाग १८६६ इ. इ.

या ग्रंथालयांतून इ. स. १८८० ते १८८४ चे सुमारास ग्रंथसंख्या किती होती तें पाहणेंही मौजेचें आहे. २००० पेक्षां अधिक ग्रंथ कोणत्याच ग्रंथालयांत दिसत नाहींत. त्यांत ८० टक्के इंग्रजी, १०–१२ टक्के मराठी, बाकी ८ टक्के इतर भाषांतील, अशी सर्वसाधारण विभागणी दिसते. मासिक वर्गणी सरसकट आठ आणे असावी. वर्गणीदारांची संख्या दहापासून साठपर्यंत कमी अधिक प्रमाणांत असल्याचें दिसून येतें. विचार करण्यासारखी गोष्ट आहे कीं १८८४ सालापर्यंत मराठी भाषेंत छापल्या गेलेल्या ग्रंथांची संख्या जवळ जवळ पांच हजारांवर असून, वरील ग्रंथालयांतून मोठ्या मिनतवारीनें दोनशें तीनशें मराठी पुस्तकें असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. हें प्रमाण उद्बोधक नाहीं काय ?

अंदाज असा आहे कीं सरकारी अधिकारी, पेन्शनर्स, वृद्ध लोक यांशिवाय इतर जनता या ग्रंथालयांकडे ढुंकूनही पहात नसावी. मी या एकंदर चळवळीला **राजमान्य अथवा बाटग्या ग्रंथालयांची चळवळ** असें म्हणतों. वरील सर्व परिस्थिति मराठी भाषेला मोठी पोषक नसून, उलट अपकर्षकच आहे, हें अनेक जणांना या सुमाराला जाणवूं लागलें होतें असें दिसतें. मराठी वाङ्मयाच्या संशोधनाला या कालीं नुकतेंच तोंड लागत होतें. पुष्कळ लोकांना निबंधमाला, विविधज्ञानविस्तार, निबंधचंद्रिका, काव्येतिहाससंग्रह इत्यादि मासिकांतील लेख वाचून मराठी वाङ्मयाचा अभ्यास करण्याची इच्छा होऊं लागली होती. अशा सुमाराला मुंबई, ठाणें व पुणें येथील कांहीं सज्जनांना मराठींत छापलेले ग्रंथ संरक्षिण्याची व एकंदर मराठी ग्रंथांचा संग्रह असलेलें ग्रंथालय स्थापण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. या सगळ्यांत श्री. विनायक लक्ष्मण भावे या थोर वाङ्मयाभ्यासक तरुणानें एकदम प्रचंड साहस करून इ. स. १८९३ सालीं **ठाणें येथें मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थापना** केली. त्या संस्थेचा हेतु ‘ पुस्तकांचा एक अजबखाना करावा व तेथें कोणतेंही मराठी भाषेंतील पुस्तक सांपडावें ’ हा होता. १९०३ सालीं श्री. भावे यांनीं ठाण्याच्या ग्रंथसंग्रहालयामार्फत , प्राचीन मराठी अप्रकाशित काव्यांच्या प्रकाशनासाठीं, ‘ महाराष्ट्र कवि ’ या नांवाचें एक संशोधनात्मक मासिक पुस्तक सुरू करून तें चार वर्षें अखंड चालविलें. या मासिकांत फक्त एक रुपया वर्गणींत वाचकांना वर्षाला डेमी आकाराच्या ६०० पृष्ठांचा मजकूर मिळत असे. याशिवाय ‘ वच्छहरण ’ व शिशुपालवध ’ हीं

दोन महानुभावी काव्येंही त्यांनीं संग्रहालयातर्फे प्रकाशित केलीं. या हकीकती-वरून कै. भावे यांची दृष्टि संग्रहालयाबाबत किती विशाल होती तें पाहिलें म्हणजे भावे यांच्या अपूर्व प्रयत्नाचें अमूप कौतुक केल्यावांचून राहवत नाहीं. भाव्यांचा प्रयत्न एक साधें ग्रंथालय स्थापावयाचा केवळ नसून, मराठी वाङ्मयसंशोधनसंस्था स्थापण्याचा त्यांचा उदात्त हेतु होता असें ह्मणावे लागतें. मला वाटतें कै. भावे यांचा हा प्रयत्न महाराष्ट्रांतील मराठी ग्रंथालयांच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. ही एक राष्ट्रीय-लोकाभिमुख -लोकमान्य ग्रंथालयांची चळवळ त्यांनीं सुरू केली असें मी म्हणतों. मराठी ग्रंथांचें संरक्षण करावें, महाराष्ट्रीय ग्रंथकारांना उत्तेजन मिळावें, सामान्य अर्धशिक्षित जनता - जिला इंग्रजी येत नाहीं - तिला मराठी भार्षेतून सर्व ज्ञान उपलब्ध करून द्यावें - असा या चळवळीचा विशाल हेतू होता. कै. भावे यांच्या नंतर त्यांचेंच अनुकरण करून मुंबई येथें १८९८ सालीं व पुणें येथें १९११ सालीं वरील प्रकारचींच मराठी ग्रंथसंग्रहालयें स्थापन झालीं.

वरील ग्रंथालयांच्या सद्यःस्थितीचा आतां विचार करूं. हा विचार करतांना या ग्रंथालयांकडे अनेक दृष्टिकोनांतून बारकाईने पहावें लागेल. ग्रंथालय म्हटलें म्हणजे (१) ग्रंथालयस्थान, (२) ग्रंथालय मंदिर, (३) ग्रंथालयांतील आरोग्य, (४) ग्रंथालयाचें उद्दिष्ट, (५) कार्यकारी मंडळ, (६) कार्यवाह अथवा चिटणीस, (७) सेवकवर्ग, (८) ग्रंथालयांतील उपकरणें, (९) ग्रंथांची निवड, (१०) ग्रंथांची बांधणी, (११) ग्रंथांची स्थिति, (१२) ग्रंथांचें वर्गीकरण, (१३) वाचकांसाठीं ग्रंथांच्या याद्या, आणि (१४) वाचक इतकीं त्याचीं स्वाभाविकच अंगें असतात. यांतील कांहीं अंगांचा, वरील ग्रंथालयांना अनुलक्षून क्रमशः विचार करूं म्हणजे सहजच वरील ग्रंथालयांच्या सद्यःस्थितीवर झगझगीत प्रकाश पडेल.

पहिलें अंग म्हणजे ग्रंथालयाचें स्थल. हें स्थल ठरवितांना ग्रंथालयाच्या चालकांनीं फार दूरवर दृष्टि राखून विचार करणें आवश्यक असतें. ग्रंथालय ही सारखी वाढती संस्था असल्यामुळें, पुढेंमागें ग्रंथालयाची इमारत वाढवावयाची झाल्यास त्यासाठीं भरपूर जागा भोंवतीं असावी लागते, म्हणून स्थल ठरवितांना

तें चांगलें विस्तृत पाहून निवडलें पाहिजे. येथें मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचें स्थल विचारार्थ घेतल्यास या मुद्यावर लख्ख प्रकाश पडेल. हें संग्रहालय ज्या जागेवर बांधलें आहे तिचा विचार करा. पश्चिमेकडे स्मशानभूमि आणि उत्तरेकडे रस्ता, तेव्हां या दोन्ही दिशांनीं ग्रंथालयाच्या वर्धनाचा मार्ग स्वभावतः खुंटलेला आहे. पूर्वेकडे व दक्षिणेकडे अगदीं खेटून घरें आहेत. हीं घरें खरेदी करून या दिशांनीं ग्रंथालयाची वाढ करणें शक्य होईल. परंतु या घरांच्या मालकांनीं आपलीं घरें विकण्याचें नाकारल्यास त्याही दिशांनीं प्रगतीचा मार्ग खुंटला. एकूण सारांश काय तर संग्रहालयासाठीं हें स्थल मुक्रर करतांना या संस्थेच्या संस्थापकांनीं फार मोठी चूक केली असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. पुणें येथील ग्रंथालयाची जागा मुळांतच चांगली विस्तृत असल्यामुळें, जुनी इमारत अपुरी पडूं लागल्याबरोबर तिच्या चालकांना नवी मोठी इमारत बांधणें शक्य झालें. ठाण्याच्या संग्रहालयाची जागाही चांगली विस्तृत असून, त्यांना इमारत वाढविणें झाल्यास जागेच्या बाबत तरी, कांहीही आडकाठी उपस्थित होणार नाहीं. एकंदरीनें स्थलाचे दृष्टीनें विचार करतांना मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थिति कांहीशी दुर्दैवाची आहे असें म्हणणें प्राप्त होतें. स्थल निवडतांना दुसऱ्याही एका दृष्टीनें विचार करावा लागतो. ग्रंथालयाची जागा जर बहुसंख्य वाचकांच्या निवासस्थानापासून फार दूर असली तर वाचकांना ग्रंथालयाचें आकर्षणच वाटणार नाहीं. व वाचकवर्ग घटत चालला तर ग्रंथालयाची अधोगति होण्यास फारसा अवधि लागणार नाहीं. ठाण्याचें ग्रंथालय नमुन्यासाठीं घ्या. हें ग्रंथालय लोकवस्तीपासून कांहींसें दूर असल्यामुळे, नवीन इमारत झाल्यावर लवकरच असें दिसून आलें कीं या नवीन दूरच्या जागीं एकही वाचक फिरकेनासा झाला व चालकांना निरुपायानें आपली वाचनालय शाखा थोड्याच दिवसांत गांवांत भाड्यानें जागा घेऊन, तेथें आणावी लागली. संग्रहालयाची जागा गोंगाटाच्या भरवस्तीच्या ठिकाणीं असावी कीं लोकवस्तीपासून दूर निवांत अशी असावी हें मुख्यत्वेंकरून ग्रंथालयाच्या स्वरूपावर अवलंबून राहील. ठाण्याचें गांवापासून किंचित् दूर व मुंबईचें आणि पुण्याचें कांहींसें आडबाजूला, या कारणानें वरील तिन्ही ठिकाणीं मराठीचीं संदर्भ-ग्रंथालयें चालविणें विशेष हितप्रद होईल. वाचनालयांसाठीं मात्र या तिन्ही ग्रंथालयांच्या जागा मोठ्याशा सोईस्कर नाहींत.

मंदिराच्या दृष्टीनें विचार केल्यास, वरील तिन्ही ग्रंथालयांत मुंबईचें मराठी ग्रंथालय हें विशेष शोभिवंत व संस्थेच्या गरजांना अनुलक्षून सोइस्कर बांधलेलें आहे असें वाटतें. मंदिराच्या खिडक्या मजबूत असाव्या; मंदिरांत चोहोंबाजूंनीं विपुल प्रकाश खेळावा; मंदिरांत ढेंकूण, चिलटें, पिसा, कोळी व झुरळें यांचा उपद्रव नसावा; शक्य तों ग्रंथालयमंदिराचें छप्पर पत्र्याचें नसावें तसेंच तें गळकेंही नसावें; मंदिराला पावसापासून नुकसानी पोंचूं नये ; इत्यादि गोष्टी-संबंधी विशेष काळजी घेतल्यास कोणतेंही ग्रंथालयमंदिर इतरांस आदर्शभूत झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

कार्यकारी मंडळ हें कार्यक्षम व स्वकर्तव्यदक्ष आहे कीं नाहीं हें संस्थेच्या उत्कर्षापकर्षावरून सहज अजमावतां येतें. पुणें व ठाणें येथील ग्रंथालयें गेलीं कित्येक वर्षे अगदीं खालावलीं असून, मुंबईचें ग्रंथालय मात्र सध्या उत्कर्षाच्या मार्गावर आहे, हें स्पष्ट दिसतें. हेमंतव्याख्यानमाला, विद्वानांचीं चिकित्सापूर्ण व्याख्यानें, ग्रंथप्रदर्शनें, ग्रंथालय संघ संस्थापना, नियतकालिकप्रकाशन इत्यादि अनेक प्रकारचीं कार्यें ही संस्था सध्या हातीं घेत आहे, यावरून या संस्थेच्या कार्य-कारी मंडळाच्या उत्साहाची व कळकळीची चांगली कल्पना येते. परंतु एवढ्याने हुरळून जाऊन हें सर्वोत्कृष्ट ग्रंथालय आहे असे अजूनही कोणी म्हणूं शकणार नाहीं. याचीं अनेक कारणें आहेत. मराठी भाषेंतील एकूण एक ग्रंथांचा संग्रह करून त्यांचें संरक्षण करणें हा जो तिन्ही ग्रंथालयांनीं प्रारंभापासून आपलेपुढें आदर्श ठेविला आहे तो एकाकडूनही अद्याप सिद्धीस गेलेला नाहीं. याचें कारण आपल्या संस्थेत नसलेले ग्रंथ हरप्रयत्नानें मिळवून आणण्याचे यत्नच अद्यापि या ग्रंथा-लयांच्या चालकांकडून पद्धतशीरपणें झालेले नसावे असें वाटतें. खाजगी ग्रंथ-संग्राहकांच्या ग्रंथालयातून–ग्रंथविक्रेत्यांच्या दुकानांतून – आपल्या संग्रहालयांत नसलेले ग्रंथ, ग्रंथालयाच्या आदर्शाला भुलून, ग्रंथालयाची वाट चालू लागतील व चांगले ते ग्रंथालयाच्या दाराशीं येऊन ठेपले कीं हळूच त्यांस उचलून आपल्या कपाटांत दडपितां येईल, व अशा रीतीनें ग्रंथालयाचें उद्दिष्ट साध्य करतां येईल –अशी तर या भोळ्या चालकांची कल्पना नसेल ना? ग्रंथ जमविण्यास केवढी यातायात करावी लागते, याची कल्पनाही त्यांना अद्यापि आलेली नसावी. सन्मान्य कार्यवाहांकडून होण्यासारखें हें कार्य नाहीं. या कामासाठीं जबाबदार पगारी अधिकारीच ग्रंथालयांत नेमल्याशिवाय भागणार नाहीं. असा अधिकारी

या ग्रंथालयांपैकीं एकानेंही अजून नेमलेला ऐकिवांत नाहीं. यामुळे ग्रंथालयांतील रोजचें नियत कार्यही शास्त्रशुद्ध होत नाहीं. ग्रंथालयासाठीं पुस्तक विकत घेतलें तर त्याचीं पानें तपासून घेणे व पानें फाडलेलीं नसल्यास तीं सुरीनें आधीं व्यवस्थित फाडून मग तें वाचावयास द्यावें ही इतकी साधी गोष्टही या ग्रंथालयांतील सेवकांना समजत नाहीं. याचा दोष सेवकांवर नसून, त्यांची नेमणूक करणाऱ्या कार्यवाहांवर आहे. सेवकांस बहुधा कमी पगारावर नेमण्यांत येतें, व त्यांचें ज्ञानही यथातथाच असतें. पुस्तकें जागचीं काढावीं, व नोंदपुस्तकांत सही घेऊन तीं वाचकांस द्यावीं इतकेंच त्यांचें अकटोविकट ज्ञान ! जे ग्रंथ रोज वाचून परत येतात ते ताबडतोब जागेवर ठेवण्याचें कामही कोठें नीटपणे होत नाहीं. जें पुस्तक विचारावें तें हमखास जाग्यावर सांपडत नाहीं. बुद्धिमान् व विचारवंत वाचक जर या ग्रंथालयांकडे येत असले तर ते मोठ्या कष्टानें व केवळ नाइलाजानेंच येत असले पाहिजेत.

या ग्रंथालयांतील ग्रंथवर्गीकरणाची पद्धतीही मोठी अजब आहे. वर्गीकरणाचें काम सामान्य सेवकाकडून करून घ्यावयाचें असल्यामुळे, अगदीं सोपे असे ज्ञानाचे वर्ग किंवा विषय केले असून, वर्गीकरणाचे ढोबळ आडाखे कसे अगदीं ठरवून टाकलेले आहेत. उदाहरणादाखल एक दोन आडाखे घेतों. आडाखा पहिला. इतिहास हा शब्द ग्रंथाच्या नांवांत असल्यास तें पुस्तक बेलाशक 'इतिहास' विषयांत टाकावें. आतां कांहीं उदाहरणें पहा. हीं सोईसाठीं मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या छापील यादींतून घेतलीं आहेत. "अमेरिकेच्या व्यवसायोन्नतीचा इतिहास" हें धंद्यासंबंधीचें पुस्तक इतिहासांत टाकलें आहे. "आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास" हें हिंदुधर्मांत पडणारें पुस्तक इतिहासांत टाकलें आहे. "ख्रिस्ती मंडळीची बखर" हें ख्रिस्तीधर्मांत पडणारें पुस्तक बखर शब्दानें फसून इतिहासांत पडलें आहे. "खुसरू राजाचा इतिहास" हें चरित्रात्मक पुस्तक, चरित्र असा स्वतंत्र वर्ग असूनही केवळ इतिहास या शब्दाच्या मुर्वतीखातर इतिहास विभागांत ठेवलें आहे. "स्वराज्य प्राप्त्यर्थ हिंदुस्थाननें केलेल्या प्रयत्नांचा इतिहास" हें भारतीय अर्वाचीन राजकारणावरील पुस्तक इतिहासांत शिरलें आहे. अशीं उदाहरणें किती द्यावीं ? असो; आतां नमुन्याखातर दुसरा आडाखा देतों. ज्या पुस्तकनामाचा शेवटचा अवयव

शास्त्र असा आहे तें 'शास्त्रीय' या विषयांत वर्ग करावें. उदाहरणें:— "अर्थशास्त्र" हें पुस्तक समाजशास्त्रांतील एका उपवर्गाचें आहे. "तर्कशास्त्र" हें तत्वज्ञानाच्या एका उपवर्गाचें आहे. "कौटिलीय अर्थशास्त्र" हें राजनीतिविषयक पुस्तक आहे. "भारतीय नाट्यशास्त्र" हें नाट्यतंत्रावरील पुस्तक आहे. "पाकशास्त्र" हें गृहांतर्गत एका विभागावरलि पुस्तक आहे. अशीं हीं अगदीं भिन्न भिन्न विषयांवरील पुस्तकें असूनही तीं सर्व "शास्त्रीय" या एकाच दावणीला बळजबरीनें बांधलीं आहेत. "निबंध" व "किरकोळ" हेही वर्ग असे सोइस्कर निर्माण केले आहेत कीं, पुस्तकाचा विषय जरा अनिश्चित व संभ्रम उत्पन्न करणारा असल्यास, वरील दोहोंपैकीं कोणत्याही एका विषयांत तें टाकण्यास हरकत नाहीं. अशा प्रकारचें एकंदर ग्रंथवर्गीकरणाचें तंत्र या तिन्ही ग्रंथालयांत आहे. यामुळे नेहमींचा रुळलेला सेवक रजेवर गेला असतां, नवीन नेमलेला मनुष्य भांबावून जाऊन महाकष्टानेंच पाहिजे असलेलें पुस्तक शोधून देऊं शकतो. अशा रीतीनें या विक्षिप्त वर्गीकरणपद्धतीमुळें, ग्रंथालयांत असलेले एका विशिष्ट विषयावरील सर्व ग्रंथ एखाद्या अभ्यासकास पाहिजे असल्यास ते शोधतांना वाचकांचा व सेवकांचा दोघांचाही फार वेळ फुकट जातो व पर्यायानें ग्रंथालयाचें मोठेंच नुकसान होतें.

ग्रंथालयांत नेमलेले सेवक पुष्कळसे असंस्कृत असल्यामुळें वाचकांनाहीं त्यांचेबद्दल विशेष आदर वाटेनासा होतो आणि ते निःसंकोचपणें ग्रंथालयाच्या नियमांचें उल्लंघन करण्यास सुरवात करतात. कांहीं वाचक दाढी करण्याचीं वस्तऱ्याचीं तीक्ष्ण पातीं खिशांतून आणून आपणाला पाहिजे असलेलीं पुस्तकाचीं पानें अलगत् कापून घरीं नेतात. कांहीं वाचक मोठमोठ्यानें गप्पा मारीत ग्रंथालयांत बसतात. कांहीं वाचक तीन तीन वृत्तपत्रें मोठ्या युक्तीनें अडवून ठेवून इतर वाचकांची कुचंबणा करतात. कांहीं वाचक पुस्तकावर तेलाचे डाग पाडतात. अशा रीतीनें कळत न कळत वाचकांकडून ग्रंथालयांचें सतत नुकसान होत असतें. गलिच्छपणाचा दोष तर सर्व ग्रंथालयांतून पुरा रुजलाच आहे. ग्रंथालयांत ठिकठिकाणीं ग्रंथांचे ढीग पडलेले असणें, आळसामुळें किंवा ठेवण्यासाठीं कपाटें नसल्यामुळे पुष्कळसे ग्रंथ माळ्यावर टाकून देणें इत्यादि अनेक प्रकारच्या गोष्टी आपल्या रोजच्या परिचयाच्या आहेत.

हें वर्णन आणखी कितीतरी वाढवितां येईल. पण आपलीच लाज कोठवर उघडी करावी ? ज्याला ग्रंथालयनीति असें म्हणतात ती आपल्या समाजांतून व ग्रंथालयांतून पूर्णपणें नष्ट झाली आहे. ही गंभीर स्थिति सुधारणें – त्वरेने सुधारणें –अगत्याचें आहे.

या रोगावर रामबाण उपाययोजना जर करावयाची असेल तर ग्रंथालयांत ताबडतोब **ग्रंथपालाची योजना** केली पाहिजे. हा ग्रंथपाल विद्वान् व बहुश्रुत असावा. ग्रंथालयशास्त्राचें त्याने शिक्षण घेतलेलें असावें. महाराष्ट्र वाङ्मयाच्या इतिहासाचें त्याला सम्यक् ज्ञान असावें. तो मितभाषी पण कार्यपटु व प्रसन्नवृत्तीचा असावा.

मराठी ग्रंथालयें लवकर सुधारावयाचीं असतील तर नेमणूक झाल्याबरोबर ग्रंथपालानें खालील गोष्टी ताबडतोब हातीं घेतल्या पाहिजेत. पहिलीः–ग्रंथालयासाठीं **वर्गीकरणपद्धतीचा निश्चय.** आज जगांत दशांश वर्गीकरण पद्धति, द्विबिंदु वर्गीकरण पद्धति, विस्तरणशील पद्धति, विषयनिष्ठ वर्गीकरण पद्धति आणि लायब्ररी ऑफ् कॉंग्रेसची पद्धति अशा पांच प्रसिद्ध वर्गीकरण पद्धति उपलब्ध आहेत. त्यांपैकीं द्विबिंदु व दशांश यांपैकीं एक आपल्या ग्रंथालयासाठीं निश्चित करून त्याने ग्रंथालयांतील एकंदर पुस्तकें विषयवार लावून टाकावीं.

दुसरी आवश्यक कृतिः–पुस्तकें एकदां विषयवार लावून झालीं कीं ताबडतोब त्या एकंदर पुस्तकांच्या **ग्रंथनामपत्रिका व ग्रंथकारनामपत्रिका** तयार करून टाकाव्या. हें काम विशेष धोक्याचें आहे. यांत चूक झाल्यास केलेलें सर्वच काम फुकट जावयाचें. यासाठीं सावकाश व सावधानतेनें हें कार्य तडीला न्यावें. या सूचि वर्णानुक्रमानें लाऊन तयार झाल्यावर एखाद्या त्यासाठींच तयार केलेल्या मंजूषेंत ठेवून द्याव्या. ही दुसरी कृति झाल्यावर, कोणी कसल्याही प्रकारें पुस्तक मागूं लागल्यास तें आपल्या संग्रहीं आहे कीं नाहीं हें तो ग्रंथपाल क्षणार्धात सांगूं शकेल. ग्रंथ विकत घेण्याचे वेळीं, अमुक ग्रंथ आपल्याला घेतला पाहिजे कीं नको हेंही त्याला या सूचीवरून सहज समजेल.

त्याने नुसतें ग्रंथपालाचें काम न करितां, संदर्भ शोधणाऱ्या व वाचकांचें मार्गदर्शन करणाऱ्या ग्रंथपालाचेंही काम केलें पाहिजे. जिज्ञासु वाचकांना मुलाखत देऊन त्याने त्यांच्या अडचणी व इच्छा समजून घ्याव्या. या योगानें वाचक व

ग्रंथपाल यांना परस्परांबद्दल आदरबुद्धि उत्पन्न होऊन ग्रंथालयांत एक प्रकारें स्नेहाचें व सहकार्याचें वातावरण निर्माण होईल.

मधून मधून समाजांत जे खडाजंगी चर्चेचे विषय उत्पन्न होतात, त्यावेळीं ग्रंथपालानें त्या विषयावरील आपल्या ग्रंथालयांतील सर्व पुस्तकांची व लेखांची सूची तयार करून वाचकांचे अवलोकनार्थ मांडून ठेवावी. उदाहरणार्थ, "नारायण-रावाचा खून कीं आत्महत्या" या अलीकडील ग्रंथावर जेव्हां वृत्तपत्रांतून सुंदोप-सुंदी सुरू झाली त्या वेळी त्या विषयावरील सर्व ग्रंथांची तसेंच नाना फडणीसांच्या सर्व चरित्रांची व त्यांजवरील लेखांची सूची त्याने फलकावर लाऊन वाचकांचें लक्ष त्या विषयाच्या अंगोपांगांकडे आकर्षित करावें.

वाचकांची अभिरुची सुधारण्यास तसेंच वाचकांची ग्रंथालयविषयक नीति सुधारण्यास वरील प्रकारच्या ग्रंथपालाची नेमणूकच कारणीभूत होईल.

युद्धोत्तर काळांत, साक्षरताप्रसार चालू असतां, सामान्य जनतेमध्यें ज्ञान-विषयक विलक्षण जिज्ञासावृत्ति वाढत असतां, आतां कोणत्या प्रकारच्या ग्रंथाल-यांची समाजाला आवश्यकता आहे तें सांगितलें पाहिजे. सामान्य जनांची जिज्ञा-साबुद्धि जर मरूं द्यावयाची नसेल तर आतां खेडोपाडीं सर्वांसाठीं लहान लहान मराठी ग्रामीण ग्रंथालयें स्थापन केलीं पाहिजेत .या खेडुतांची मातृभाषा मराठी असल्यामुळे त्यांना पुरवावयाचें ज्ञानही आपणाला मराठींतूनच द्यावें लागेल. आतां विश्वव्यापी ध्येयाचीं सर्वसंग्राहक मोठीं मराठी ग्रंथालयें जास्त काढूं नका. मजूरवर्गासाठीं व सामान्य जनांसाठीं लहान लहान ग्रंथालयें आणि वाचनालयें काढा. या योगाने लोकजागृतीचें कार्य झपाट्यानें होऊन स्वातंत्र्यासाठीं सरकारशीं झगडण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त होईल.

आजच अशीं मराठी पुस्तकांचीं ५०८ ग्रामीण ग्रंथालयें निर्माण झालीं आहेत, असें मला नुकतेंच एका सरकारी यादीवरून समजलें. या ग्रंथालयांची माहिती मिळवून त्यांना आपण सर्वतोपरी साह्य केलें पाहिजे.

येथवर ग्रंथालयाची व्याख्या, अव्वल मराठशाहींतील ग्रंथांची स्थिति, नंतरच्या ब्रिटिश अमदानींतील राजमान्य नेटिव्ह ग्रंथालयांची अवस्था, नंतर मराठी भाषेच्या कळवळ्यानें प्रेरित होऊन स्थापण्यांत आलेल्या लोकमान्य मराठी ग्रंथालयांचा प्रसार, त्यांची सद्यःस्थिति, त्यांच्या सुधारणुकीसंबंधी कांहीं

व्यावहारीक सूचना आणि अगदीं आजच्या काळांत अस्तित्वांत येत असलेलीं शेंकडों मराठी ग्रंथालयें व त्यांची भूमिका इत्यादि विषयांसंबंधीं थोडें थोडें विवेचन केलें; आतां हें निरूपण संपविण्यापूर्वी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मराठी ग्रंथालय संघ, व मुंबई सरकार यांस कांहीं सूचना करणें आहेत त्या करून हें लांबलेलें भाषण संपवितों.

## मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयास सूचना

आतांपर्यंत या संग्रहालयाचें धोरण ग्रंथांचा आणि नियतकालिकांचा संग्रह करणें आणि सुशिक्षित वाचकांना पुस्तकें पुरविणें, इतकेंच संकुचित आहे. यापुढें या संग्रहालयानें विशाल धोरणाचा अवलंब करावा हें अगदीं क्रमप्राप्त आहे. ग्रंथ जमा करणें किंवा नियतकालिकें गोळा करणें हें काम अगत्याचें आहेच. पण याठिकाणीं वृत्तपत्रांचा संग्रह असणेंही जरूरीचें आहे. वृत्तपत्रें म्हणजे जिवंत इतिहासच आहे असें समजण्यांत येतें, तेव्हां त्यांचा अवश्य संग्रह केला पाहिजे. हस्तलिखितांकडे तर आतांपर्यंत या संग्रहालयानें दुर्लक्षच केलें आहे. ही शाखा प्राचीन वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें उपेक्षणीय नाहीं. त्याचप्रमाणें ऐतिहासिक मोलाचीं पत्रें, थोर थोर व्यक्तींचीं हस्ताक्षरें, त्यांच्या प्रतिमा, महाराष्ट्र वाङ्मय, संस्कृति व इतिहास एतत्संबंधीं अनेक भाषांतील ग्रंथ यांचा संग्रहही याच ठिकाणीं व्हावा आणि प्रत्येक महाराष्ट्रभाषाभाषिकाचें, महाराष्ट्र समाजांतील प्रत्येक व्यक्तीचें, प्रत्येक अभ्यासकाचें, प्रत्येक संशोधकाचें, हें आपलें म्हणण्याय योग्य असें, आपलें सर्वांचें प्रियतम '**महाराष्ट्र संग्रहालय**' अर्थात् महाराष्ट्राचें British museum व्हावें हीच आमची मनोभावाची इच्छा आहे.

## मराठी ग्रंथालय संघाला सूचना

आज आपण सर्वांनीं जो मराठी ग्रंथालय संघ स्थापन केला आहे, त्यालाही येथें एकदोन सूचना केल्या तर तें अप्रस्तुत होणार नाहीं. पहिली सूचना अशी कीं या संघाने मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा इतक्या संकुचित क्षेत्रापुरतें कार्य करण्याचें जें ठरविलें आहे तें विशेष हितावह नाहीं. आज मुंबई हें एक लहानसें शहर राहिलें नसून तें महानगर बनलें आहे. येथील लोकसंख्या प्रचंड असून येथें साधनसंपत्ति तर अपरंपार आहे. हें नगर मुंबई प्रांताची केवळ राजधानी नसून हिंदुस्थानचें तें प्रवेशद्वार आहे. जगांत ज्या ज्या नव्या चळवळी

उद्भवतात, जे जे नवे विचार प्रगटतात त्यांचा प्रतिध्वनि प्रथमतः मुंबई शहरांत उमटतो. अशी मोठी सोय ज्या तुम्हांस लाभली आहे, त्यांनीं खरें पाहिलें तर महाराष्ट्रांतील एकंदर मराठी ग्रंथालयांचें धुरीणत्व पत्करिलें पाहिजे. यासाठीं तुमचें पहिलें कर्तव्य म्हणजे मुंबई, उपनगर व ठाणें जिल्हा यांतील मराठी ग्रंथालयांची व वाचनालयांची प्रथमतः, व नंतर महाराष्ट्रांतील सर्व मराठी ग्रंथालयांची विस्तृत सूचि तयार करणें हें होय. या सूचींत १ ग्रंथालयाचें नांव, २ उद्देश, ३ स्थल, ४ स्थापनावर्ष, ५ प्रारंभीची ग्रंथसंख्या, ६ आजची ग्रंथसंख्या, ७ वाचकांची संख्या, ८ वाचकांची अभिरुचि इत्यादि सर्व माहितीची अद्ययावत् नोंद ठेवावी. या ग्रंथालयांच्या अडचणी समजून घेऊन त्यांवर उपाययोजना सुचविण्याचें कामही संघानेंच हातीं घेतलें पाहिजे. इतकें केलें म्हणजे संघाचें पहिलें कर्तव्य संपलें. आतां दुसऱ्या कर्तव्याकडे वळूं. आज घटकेला बृहन्महाराष्ट्रांत इतके मराठी ग्रंथ निर्माण होत आहेत कीं त्यांची माहिती करून घेणें हेंही मोठें प्रयासाचें काम झालेलें आहे. यासाठीं संघानें प्रतिवर्षी निघणाऱ्या मराठी ग्रंथांची एक लघुवर्णनात्मक व वाचनालयांना मार्गदर्शक अशी सूची प्रसिद्ध करावी. या सूचीमध्यें ग्रंथांची निवड करण्याचीही सोय केलेली असावी. या कार्यासाठीं एक विद्वत्समिति नेमून–ती समिति वर्षांतील उत्तमोत्तम म्हणून जे ग्रंथ निवडील–त्या ग्रंथांच्या नांवामागें कांहीं नक्षत्रासारखी खूण छापल्यास, लहान ग्रंथलयांस ग्रंथांची निवड सुलभतेनें करतां येईल.

तिसरी व अत्यंत तांतडीने हातीं घेण्याची गोष्ट म्हणजे ग्रंथालयसेवकांच्या शिक्षणाची. आज महाराष्ट्रांत तीन मोठीं मराठी ग्रंथालयें व शेंकडों ग्रामीण ग्रंथालयें अस्तित्वांत आहेत. या ग्रंथालयांची स्थिति पुष्कळशी केविलवाणी आहे असें म्हटल्यास फारसें वावगें होणार नाहीं. ग्रंथालयें उत्तम प्रकारें चालण्याला वाचकवर्ग विपुल पाहिजे हें जितकें खरें, तितकेंच ग्रंथालयांतील सेवकवर्गही आपल्या कार्यांत तत्पर व ग्रंथालयशास्त्रांत निष्णात असा असला पाहिजे, हें सांगावयास नकोच. पाश्चिमात्य देशांत ग्रंथालयसेवकांच्या शिक्षणासाठीं शेंकडों शाळा चालविण्यांत येतात. हिंदुस्थानांत, अलीकडे, कांहीं विद्यापीठांनीं ग्रंथालय-शास्त्राच्या अध्यापनाचें कार्य हातीं घेतलें आहे. पण हें शिक्षण संपूर्णपणें इंग्रजींत होत असल्यामुळें आपल्या मराठी ग्रंथालयांच्या सेवकांना त्याचा उपयोग कसा

होणार ? तेव्हां तुमच्या संघानें ग्रंथालयशास्त्राचा—निवळ मराठींतून शिक्षण देणारा वर्ग काढावा अशी माझी आपणास आग्रहाची विनंति आहे. या शिक्षणाचा पाया ह्मणून पहिल्यानें ग्रंथालयशास्त्राची सुगम परिभाषा निर्माण करावी. नंतर विद्वान् ग्रंथपालांकडून ग्रंथालयशास्त्राच्या विविध अंगोपांगांवर लहान लहान प्रवेशिका तयार करवून घ्याव्या. श्री. पारखी यांचा " ग्रंथालयशास्त्राचा ओनामा " हा ग्रंथ पूर्वीच छापलेला असून आज त्याचा तात्काल उपयोग होणारा आहे. मीही 'ग्रंथसूचिशास्त्र' या विषयावरील निबंध, आणि 'दशांश वर्गीकरणपद्धतीचीं प्रारंभींचीं कोष्टकें' मराठींत मांडणी करून छापलीं आहेत. श्री. रंगनाथन् यांच्या Colon classification चें भाषांतर मी सध्यां हातीं घेतलेलें आहे. विशेष ह्मणजे त्या वर्गीकरणपद्धतींत वर्ग दर्शविण्यासाठीं जो रोमन वर्णांचा उपयोग त्यांनीं केला आहे त्याचा त्याग करून महाराष्ट्रांतील ग्रंथालयांना विशेष उपयोगी पडतील अशा नागरी वर्णांचा उपयोग करण्याचे मी ठरविलें आहे. अशा प्रकारचे आणखीही इतरांचे प्रयत्न चालू असून त्यांचा ग्रंथालयशास्त्राची शाळा चालविण्याला चांगलाच उपयोग होईल असें मला वाटतें. आपला संघ अशा प्रकारचें कार्य सत्वर हातीं घेईल अशी मी आशा करतों.

आणखी एक लहानशी सूचना मला करावयाची आहे; पण ती विचारार्थ संघापुढें न ठेवतां मी ती मुंबई विद्यापीठाच्या चालकांपुढें नम्रपणानें मांडतो. जगांतील अमेरिकेसारख्या अत्यंत सुधारलेल्या देशांतील मोठमोठ्या ग्रंथालयांतून पुस्तकें ठेवण्यासाठीं, ग्रंथनामपत्रिका ठेवण्यासाठीं, नियतकालिकांसाठीं, वृत्त-पत्रांसाठीं, पत्रकांसाठीं, खास संशोधकांसाठीं, सामान्य वाचकांसाठी, प्रकाश-नियंत्रणासाठीं, जीं नानाविध उत्तमोत्तम उपकरणें आज उपयोजिण्यांत येत आहेत त्यांचा एक एक नमुना विकत आणून त्यांचें एक स्थायी प्रदर्शनालय विद्यापीठानें एखाद्या सोइस्कर ठिकाणीं स्थापन करावें. त्यायोगें महाराष्ट्रांतील कारागिरांना तर साह्य होईलच पण त्याचेच द्वारें मराठी ग्रंथालयेंही अल्प खर्चांत आदर्शवत् करण्याला त्याचा मोठा उपयोग होईल.

## सरकारला विनंति

मुंबई सरकारची, तसेंच ठिकठिकाणच्या नगरपालिकांची, तसेंच ग्राम-सभांची ग्रंथालयांबद्दलची वृत्ति मोठीशी नांवाजण्यासारखी नाहीं. अलीकडे

ग्रामीण ग्रंथालयांना शासनसंस्थेकडून काय मदत मिळत असेल ती असो पण मोठमोठ्या ग्रंथालयांना मात्र सरकारकडून कांहींही मदत मिळत नाहीं हें मोठ्या कष्टाने नमूद करावें लागतें. वृत्तपत्रें, पाठशाला आणि ग्रंथालयें ही लोकशिक्षणाचीं प्रभावी साधनें आहेंत. हा मुद्दा आतां वादात्मक राहिलेला नाहीं ही गोष्ट लक्षांत घेऊन सरकारनें यापुढे महाराष्ट्राची मातृभाषा जी मराठी तिच्या ग्रंथालयांना सढळ हातानें मदत द्यावी हें उचित होय. सध्यां जें सरकार अस्तित्वांत आहे त्यांचेपुढें ही विनंति करून कांहीं साध्य होणार नाहीं हें मी जाणून आहे. पण लवकरच कदाचित् लोकाभिमुख मंत्रिमंडळे स्थापन होण्याचा संभव दिसत आहे, तेव्हां त्यांच्या कर्णपथावरून या सूचना गेल्यास कांहीं उपयोग झाल्यास पहावें एवढाच यांतील हेतु आहे. Library Development Committee नें ग्रंथालयांच्या प्रसाराबाबत जो वृत्तांत १९४२ सालीं प्रसिद्ध केला तो सध्यां जरी सरकारी दप्तरखान्यांत धूळ खात पडला असला, तरी लवकरच त्याचें पुनरुज्जीवन होईल आणि महाराष्ट्र-वाङ्मय-गंगेच्या तीरावर ठिकठिकाणीं मराठी ग्रंथालयें स्थापित होऊन, महाराष्ट्रीय जनता तेथें आकंठ ज्ञानपान करून स्वराज्य मिळविण्याला आणि सुराज्य भोगावयाला पात्र होईल अशी माझी नम्र आशा आहे.

---